" पण या शिवाजीसंगं तिनं लगीन बिगीन तरी लावलय् का नाहीं ? " चिलमीचा धूर सोडीत एका म्हाताऱ्यानें पृच्छा केली.

" तें काय जणं ! पण दादलाच म्हणायचा नाहीं तर काय ! साखरीचं त्याच्यावर लई अफ्लाद पिरेम आहे अफ्लाद ! "

दुसरे दिवशीं बारा वाजतां साखरीचा खेळ सुरू व्हायचा होता. दहा वाजल्यापासून लोक जागा धरून बसले होते. लंगोट कसलेले पीळदार शरीरांचे कोल्हाटी ढोलकीं पिटून मोटमोठ्यानें ओरडत होते. थाप गर्दी झाली होती. बाजार केव्हांच मंदावला होता. वेशीची भिंत, घरांचीं माळवदें आणि आजूबाजूचीं झाडें माणसांनीं गच्च फुलून गेलीं होतीं. एका उंचशा जागेवर जाजम अंथरून गांवच्या इनामदारांसाठीं जागा राखून ठेवली होती. जाजमाच्या बाजूला तीनचार येसकर व जागले उभे होते.

बाळासाहेब इनामदार म्हणजे एक भारी आसामी होती. भोवतालचीं पांचसहा गांवें त्यांना इनाम होतीं. याशिवाय जमीनजुमला गडगंज होता. गेल्याच वर्षी त्यांचे वडील वारले. म्हाताऱ्याजवळ चांगली माया होती असें म्हणतात.

बारा वाजण्याच्या सुमारास इनामदार आले. लोकांनीं भराभर बाजूला सरून त्यांना वाट करून दिली. त्यांच्याबरोबर त्यांची दोनचार दोस्त मंडळी होती. बाळासाहेबांनीं अंगांत भारी गरम कापडाचा कोट घातला होता व डोक्याला गुलाबी रंगाचा भरजरी पटका ऐटबाजपणें बांधला होता. पाठीवरचा शेमला उन्हानें चमचम करीत होता. त्यांच्या गौरवर्ण चेहऱ्यावर श्रीमंतीचें तेज आणि तारुण्याचा उन्माद दिसत होता. नुकत्याच उगवलेल्या मिशांचीं टोकें मधूनमधून दातांत धरण्याची त्यांना खोड होती. इकडे तिकडे पहात बाळासाहेब जाजमावर जाऊन बसले.

एका जागल्यानें छत्री उघडून त्यांच्या डोक्यावर धरली. कोल्हाट्यांनीं पुढें येऊन वाकून त्यांना मुजरे केले. खेळ सुरू झाला.

सुरवातीला पोरांची कसरत आणि उड्या झाल्या. नंतर कोल्हाटी व कोल्हाटणी यांनीं कसरती करून दाखविल्या. त्यांचीं शरिरें वेताच्या छडी-सारखीं करकर वाकत होतीं. जणूं कांहीं तीं हाडामांसांचीं नसून रबराचीं बनविलीं होतीं ! दोनतीन ढोल वाजत होते. लोकांची गडबड शांत झाली होती; पण खेळाला अजून रंग भरला नव्हता. अजून साखरी आली नव्हती. लोकांच्या नजरा वरचेवर तिच्या पालाकडे वळत होत्या.

इतक्यांत ‘ साखरी, साखरी ’ असा कल्लोळ सुरू झाला. चार हजार माना करदिशी वळल्या. लिंबाजीच्या खांद्यावर उभी राहून साखरी येत होती. तें दृश्य मोठें पहाण्यासारखें होतें. तंग कसलेल्या लंगोटांत लिंबा-जीचा उंचापुरा पिवळा धम्मक देह त्याच्या नांवाप्रमाणेंच चमकत होता. त्याच्या उमद्या चेहऱ्यावर हसूं खेळत होतें. आपली आवडती मैना उडून खांद्यावर येऊन बसावी ना, तितकीच त्याला साखरीच्या ओझ्याची दखल होती. लांबलांब ढांगा टाकीत तो खेळाच्या जागेकडे येत होता.

लिंबाजीच्या खांद्यावर ताठ उभी राहिलेल्या साखरीला पहातांच, दिवसाढवळ्या आभाळांतून वीज खाली यावी, तसें लोकांना झालें. गडद हिरव्या रंगाच्या जरीकांठी लुगड्यांत साखरीचा गोरापान रंग खुलून दिसत होता. तिच्या मांसल दंडाला करकोचे पडतील इतकी तिची जरीची सोनसळी चोळी तंग होती. लुगड्याच्या भरजरी पदराचा तिनें पचंग कसला होता. तिच्या गालांवर आणि हनुवटीवर गोंदणाचे गर्द हिरवे थेंब उठून दिसत होते. तसेंच हातावरल्या गोंदकामांत ‘ लिंबाजी ’ अशीं अक्षरें होतीं. ठळक लावलेल्या जांभळ्या कुंकवाखालीं, भिवयांमध्यें काळ्या तिटेचा बारीक थेंब रेखून लावलेला होता. ते तिचे काळे टपोरे डोळे—पिवळी जर्द तल्लख नागिणमुळां नजर टाकतांच थबकेल असें पाणी होतें त्या डोळ्यांत. बहिरीससाण्यानें झेप टाकावी तशीं तिच्या डोळ्यांतलीं बुबुळें इकडे तिकडे फिरून जमलेल्या लोकांच्या अंतरांचा ठाव घेत होतीं. त्यांत मार्दव होतें का ? छे, मुळींच नाहीं ! सौंदर्य ? नव्हतें असें कसें

म्हणतां येईल ? पण तिच्या नांवाची गोडी तिच्या डोळ्यांत ग्यास नव्हती. चार क्षण तिच्या डोळ्यांकडे टक लावली, तर आपल्या डोळ्यांत मिरची गेली असें वाटत असे लोकांना.

खेळाच्या जागीं आल्यावर तिनें खण्णदिशीं दंड थोपटले आणि लिंबाजीच्या खांद्यावरून खालीं उडी मारली. दोघांनीं पुढें येऊन इनामदारांना मुजरे ठोकले. मैदानाच्या मध्यभागीं येऊन साखरीनें आपलें शरीर मागें झोकलें. तिनें केलेली आपल्या शरिराची कमान पहाण्यासाठीं लोकांनीं आपल्या मानेचे बगळे केले. साखरीची कसरत सुरू झाली. हातांच्या तळव्यांवर उभे राहून, मग पायांवर, मग पुन्हा हातांच्या तळव्यांवर याप्रमाणें ती इतक्या वेगानें फिरूं लागली, कीं तिच्या शरिराचें चक्र पहातांना लोकांच्या नजरा फिरूं लागल्या. तिच्या कसरतीकडे पहात लिंबाजी सिंहासारखा उभा होता. जणू काय साखरी हें जाळाचें फिरणारें कडें असून हा सिंह त्यांतून उडी घेणार होता.

नंतर दोरावरची कसरत सुरू झाली. आपण आपल्या घरांत फिरावें ना, तितक्या संथपणें ते लोक दोरावर कामें करूं लागले. लिंबाजीनें तर कमालच केली ! आपल्या खांद्यावर एकावर एक तीन माणसें उलटीं-पालटीं उभीं करून तो दोरावरून चालला. एका बाजूला एक घोडें आणि दुसऱ्या बाजूला एक गाढव उलटें बांधून, तो वासा खांद्यावर घेऊन, त्यानें त्या दोरावरून त्यांची वरात काढली. नंतर साखरी. एक थाळा दोरावर टेवून ती कंबरेवर हात टेवून त्यांत उभी राहिली आणि थाळा सरकत सरकत पलीकडच्या टोकाला गेला व पुन्हां मागें सरकत आला. लोकांचे हात टाळ्या पिटून दुखून गेले. त्यांच्या डोळ्यांना टक न हलवल्यामुळें पाणी येऊं लागलें. त्याच्या कशांतले पैसे कोल्हाटणी थाळे घेऊन हिंडत होत्या त्यांत रिकामे होऊं लागले. आणि दोन्ही पायांच्या घोट्यांत एक अंडें टेवून साखरी तें अंडें घोळवीत घोळवीत दोरावरून पुढें सरकूं लागली, तेव्हा तर आतां ही पडेल कीं काय, या

धास्तीनें लोकांनीं आपले जीव मुठीत धरले. पण साखरी जितक्या सफाईनें पुढें चालली तशीच मागें फिरलेली पाहून साखरीपुढें सर्कशी झक मारतात अशी त्यांची खात्री झाली. दोराच्या टोकापर्यंत साखरी मागें आल्यावर लिंबाजीनें तिच्या पायांमधलें अंडें काढून घेतलें. साखरीनें खालीं उडी मारली. लिंबाजीनें तेंच अंडें तिच्यावरून ओवाळून दक्षिण दिशेकडे फेकून दिलें.

त्याच्या साखरीला लोकांची दृष्ट होत होती.

खरेंच दृष्ट होत होती तिला ! बाळासाहेब इनामदार डोळ्यांत प्राण आणून तिच्या खेळाकडे, नव्हे तिच्याकडे पहात होते. साखरीनें त्यांच्या हृदयाची पकड घेतली होती. आजूबाजूची मित्रमंडळी आपली चेष्टा करताहेत याचें त्यांना भानहि नव्हतें. मधल्या विश्रांतीला साखरी व लिंबाजी पालाकडे गेले, तेव्हां त्याना वाचा फुटली,

" नशीबवान आहे लेकाचा ! "

तोंपर्यंत एडक्यांच्या टकरा व इतर कोल्हाट्यांचे किरकोळ खेळ झाले, पण तिकडे बाळासाहेबांचें लक्ष नव्हतें. दुपार टळत चालली होती तरी लोक कंटाळले नव्हते. एवढेंच नाहीं तर एवढ्यांत सूर्य इतका कसा ढळला याचेंच त्यांना नवल वाटलें.

साखरी व लिंबाजी परत आल्यावर त्यांचे राखीव खेळ सुरू झाले. एका बैलगाडींत वीसपंचवीस माणसें कोंबून भरून लिंबाजीनें ती गाडी आपल्या शेंडीनें ओढली. उजव्या हातानें त्यानें एक भला मोटा दगड फोडून दाखवला. लिंबाजीची ती ताकद पाहिल्यावर साखरीकडे कोणी वाईट नजर कां टाकीत नाहीं याचा लोकांना उलगडा झाला.

उन्हें लांबत चाललीं होतीं. आतां दोनच कामें करून दाखवावयाचीं राहिलीं होतीं. एक माणूस जेमतेम बसेल एवढा बांबूच्या कामट्यांचा पेटारा तिथें आणण्यांत आला. एक लांब दोरी घेऊन लिंबाजीनें साखरीचे हातपाय करकचून बांधले; तिला उचलून त्या पेटाऱ्यांत टाकलें; आणि

झाकण लावून घेतलें. एक पल्लेदार तीक्ष्ण फाळाचा भाला घेऊन त्यानें बोट फिरवून त्याची धार चाचपली. एक लिंबू हातांत घेऊन त्यानें त्यावर हलकेंच फाळ फिरवला. लिंबाच्या फाका पडल्यावर त्याला समाधान झालेसें दिसलें. सगळ्या लोकांना नीट पहाण्यासाठीं एकवार वजावून त्यानें तो भाला उगारला. कोल्हाट्यांनीं ढोल थांबवले होते. भाल्याच्या फाळावर जात्या सूर्याचे किरण चमकत होते. लोकांनीं आपले श्वास निरोधून धरले होते. देवास नमस्कार केल्यासारखें करून त्यानें तो भाला कचदिशी पेटाऱ्यांत खुपसला. बायाबापड्या रडूं लागल्या. जाणतीसवरतीं माणसेंसुद्धां ' च च ' करूं लागलीं. लिंबाजीनें भाला उपसून घेतला व पेटाऱ्याचें झाकण उघडलें. मोकळ्या हातापायांनीं साखरीनें टुण्णदिशी बाहेर उडी मारली आणि दोऱ्याची गुंतावळ बाजूला फेकून दिली.

आतां एकच काम राहिलें होतें. साखरी पुढें होऊन छातीवर हात टेवून उच्च आवाजांत लोकांना म्हणाली,

" लोकहो, माझ्या डोळ्यांकडे पहा. "

लोकांनीं पाहिलें. तिचे डोळे अवर्णनीय तेजानें चमकत होते. बाळा-साहेबांना राहवेना. आपल्या एका दोस्ताला कोपरखळीनें डिवचून ते म्हणाले,

" काय डोळे आहेत पण ! नुसता डोळ्यांचा मुका घेतला तरी बस्स ! "

इतक्यात साखरी पुढें येऊन म्हणाली,

" आतां हे माझे डोळे मी फोडून घेतें."

" नको नको ! " एकच गिल्ला झाला.

" घाबरूं नका ! मी काय करतें तें नीट पहा. या माझ्या हातांत दोन सुया आहेत. यांचीं टोकं वर करून मी या मातींत रोवतें. नीट बघा. "

तसें करून ती त्या सुयांकडे पाठ करून उभी राहिली आणि तिनें

आपलें शरीर मार्गे झुकवायला सुरवात केली. तिनें आपलें हात कमरेवर ठेवले होते. तिचें शरीर जसजसें खालीं वाकूं लागलें तसतसे तिचे डोळे सुयांच्या टोकांजवळ येऊं लागले. तिचें डोकें तीळतीळ खालीं येत होतें. या दोन सुयांच्या टोकांवर तिनें आपले डोळे मिटले आणि पापण्यांनीं ती त्या सुया मातींतून उपसूं लागली. तिच्या पाठीची कमान जर एक केसभर खालीं सरकली असती तर— छे: ! तो विचारच नको ! मिटलेल्या डोळ्यांनीं पापण्यांत सुया धरून ती आपल्या पाठीची कमान सरळ करून ताठ उभी राहिली. सुया बोटांनीं काढून घेऊन तिनें डोळे उघडले. श्रमामुळें तिच्या डोळ्यांना पाणी आलें होतें व ते जास्तच सुंदर दिसत होते. बाकीच्या कोल्हाटणींनीं पुन्हा थाळे फिरवून पैसे गोळा करायला सुरवात केली. खेळ संपला.

साखरी पालाकडे जायला निघणार इतक्यांत इनामदारांच्या एका जागल्यानें पुढें येऊन तिला कायसेंसें सांगितलें. ती लोकांच्यापुढें थाळा घेऊन कधींच फिरत नसे. तसा तिचा रिवाजच नव्हता मुळीं ! पण " इनामदारानी थाळा घेऊन बोलावलय् " असा निरोप आल्यावर काय करावें हें तिला सुचेना ! तिनें लिंबाजीकडे पाहिलें. त्यानें संमतिदर्शक मान हलविल्यावर ती थाळा घेऊन इनामदाराच्यापुढें गेली आणि ताठ उभी राहिली. बाळासाहेबांनी तिच्याकडे हसून पाहिलें; कमरेला गुंडाळलेला कसा काढला; आणि तो तिनें धरलेल्या थाळ्यांत उपडा केला. थाळा भरून गेला. ओततांना पांचसात रुपये खालीं सांडले ते तसेच पडूं देऊन साखरी परत फिरली.

" उद्यां पुन्हां खेळ होईल. आजचा खेळ संपला. "

असें लिंबाजीनें ओरडून सांगितल्यावर लोक पांगूं लागले. कोल्हाटी लोक सामान आवरूं लागले. साखरी पालांत जाऊन बसली. बाळासाहेब मात्र आपल्या दोस्तांसकट तिथेंच रेंगाळत होते. त्यांनीं लिंबाजीला बोलावून घेतलें आणि रात्रीं सगळ्या फडाला घेऊन वाड्यावर जेवायला

येण्याचें आमंत्रण दिलें. प्रत्यक्ष इनामदारांनीं जेवायला स्वतः दिलेलें आवातणें ! लिंबाजी 'नाहीं' कसा म्हणणार ! त्यानें होकार दिला. बाळासाहेब वाड्याकडे वळले.

रात्रीं नऊ वाजतां इनामदाराच्या वाड्याचा पुढला चौक कोल्हाटी लोकांनीं भरून गेला. बायकापोरें घेऊन ते आले होते. इनामदारांनीं लिंबाजीचें स्वागत करून त्याला बैठकीवर बसविलें. त्या घोळक्यांत त्यांना साखरी दिसली नाहीं. त्यांनीं तशी विचारपूस केली. साखरीचें डोकें दुखत असल्यामुळें ती येऊं शकली नाही असें लिंबाजीनें सांगितलें.

चौकांत सुतडे अथरले होते, त्यावर कोल्हाटी लोक बसले. आढ्याला लटकलेल्या हड्यांझुंबरातून वासाच्या तेलाचे दिवे जळत होते. सोप्यांतल्या बिछायतीवर बाळासाहेब, लिबाजी आणि बाळासाहेबांचे मित्र बसले होते. गडीमाणसें इकडे तिकडे येजा करीत होती. मागल्या चौकांतून येणारा मटणाच्या मसाल्याचा खमंग वास नाकात भरत होता. बाळासाहेबांनीं लिंबाजीच्या खेळाची तोंडभर प्रशंसा केली. लिंबाजी गप्प बसून राहिला. त्याला चुकल्यासारखें वाटत होतें.

जराशानें बाटल्या घेऊन येण्यासंबंधीं बाळासाहेबानी हुकूम फर्मावला. गड्यांनीं पांचपन्नास बाटल्या पुढ्यात आणून ठेवल्या. त्या पांढऱ्या स्वच्छ बाटल्यामधून मोहाच्या फुलांची पिवळी मदिरा मोहक हास्य करीत होती. दारू अस्सल आहे कीं नाही हें पहाण्यासाठीं बाळासाहेबांनीं एक बाटली उचलून जमिनीवर ओतली व तिथें काडी लावली. भप्पदिशी जाळ झाला. मदिरेच्या पिपासेचा जाळ कोल्हाट्यांच्या तोंडावर जळू लागला.

बाळासाहेबांनीं एक ग्लास व बाटली लिंबाजीच्या पुढें सरकविली व स्वतः एका ग्लासांत थोडीशी दारू ओतून ते घोटघोट घेऊं लागले. लिंबाजीनें ग्लास बाजूला सारून बाटली तोंडाला लावली. बाकीच्या बाटल्या चौकांत ठेवल्याबरोबर पांगल्या जाऊन बायकापुरुषांच्या तोंडीं लागल्या. त्यांची कचकच सुरू झाली. लागेल तशा बाटल्या गडीमाणसें

पुरवीत होतीं. लिंबाजीच्या बाटलीचें बूड उघडें पडल्यावर दुसरी बाटली आली आणि तीहि खालीं जाऊं लागली. त्याचे डोळे लाल आणि ताठर पडले होते. बाळासाहेबांचा ग्लास अजून संपतच होता. मदिरेनें ओलावलेल्या त्यांच्या ओंठाना स्मित हास्याची मुरड पडली होती. ग्लास खालीं ठेवून ते लिंबाजीला म्हणाले,

"मागल्या चौकांत तुमची जेवणाची सोय केली आहे. तुमचं हें आटोपल्यावर तिकडे जा. आणखी लागली तर मागून घ्या; अनमान करूं नका. मी जरा वर जाऊन येतो."

लिंबाजीनें मान हलवली आणि बाळासाहेब वर गेले.

थोड्याच वेळांत वाड्याच्या मागल्या बाजूनें एक व्यक्ति बाहेर पडली आणि गांवाबाहेरच्या कोल्हाट्यांच्या तळाकडे चालूं लागली. वाड्यातून कोल्हाट्यांचा गिल्ला ऐकूं येत होता. ती व्यक्ति झपाट्यानें चालत होती. वेस जवळ आली. पालें दिसूं लागलीं. एका मोटया पालांतून दिव्याचा प्रकाश अधुकपणें दिसत होता. ती व्यक्ति चोरट्या पावलांनी तिकडे वळली. आजूबाजूच्या बाभळीच्या झाडांमधून रातकिड्याचा भेसूर आवाज घुमत होता.

वाड्यांत कोल्हाटी लोक मोटमोठ्यानें हसत, खिदळत आणि भांडत मटणभाकरीवर ताव मारीत होते. लिंबाजी जेवायला बसला नाहीं. आपले सगळे लोक जेवायला बसले आहेत कीं नाहींत तें एकवार पाहून त्यानें चार भाकऱ्या व तांब्याभर मटण मागून घेतलें व तो जायला निघाला. बाळासाहेबांच्या दोस्तांनीं त्याला तेथेंच जेवणाचा भारी आग्रह केला, पण तो ऐकेना. बाळासाहेब कोठें आहेत म्हणून विचारतां, ते झोपले आहेत असें त्याला समजलें. त्यांना रामराम सांगायला सांगून तो वाड्याच्या बाहेर पडला. आणखी दोन मोठाले दगड हातानें फोडले असते तरी लिंबाजीला धाप लागली नसती, पण या दोन बाटल्यांनीं त्याचे झोक जात होते.

वेशीच्या जवळ आल्यावर त्याला आपल्या कुत्र्याचें भुंकणें ऐकूं आलें. त्याचा आवडता कुत्रा 'टेप्या' कातवून कातवून भुंकत होता. लिंबाजी धावतच पालाजवळ गेला आणि त्यानें आंत डोकावलें. साखरी हातांत डोकें गच्च धरून बसली होती. त्यानें टेप्याच्या डोक्यावर हात फिरवून त्याला शांत केलें आणि तो आत गेला. साखरी पालाच्या समोरच्या कनातीकडे ताठ नजरेनें पहात होती. साऱ्या सर्पजातीचें विष तिच्या डोळ्यात एकवटलेलें दिसत होतें. तिच्या कपाळावर विस्कटलेल्या केसांच्या बटा आल्या होत्या आणि तिचा भरगच्च स्तनभार जोरजोरानें खालीवर होत होता. तिनें लिंबाजीकडे पाहिलें नाहीं आणि लिंबाजीनें तिला किती वेळ चुचकारलें तरी ती शब्दहि बोलेना! झटक्यांत लिंबाजीची नशा उतरली.

दुसरे दिवशीं पुन्हा बारा वाजतां खेळ सुरू झाला. आज कालच्याहि-पेक्षा जास्त गर्दी होती. कोल्हाटी लोक मोठमोठ्यानें ढोल पिटीत होते. आकाशांत तुरळक ढग इकडे तिकडे फिरत होते. त्यामुळें मधूनमधून शिराळ पडत होतें. इनामदार आणि त्यांची मित्रमंडळी कालच्याच जागेवर टाकलेल्या बसकुरावर येऊन बसली. आदल्या दिवशींच्या दारू-पाण्यानें तृप्त झालेल्या कोल्हाट्यांनीं आज इनामदारांना जास्त लवून मुजरे केले. कसरतीला सुरवात झाली.

पुन्हा कालच्याप्रमाणें लिंबाजीच्या खांद्यावर उभें राहून साखरीनें खेळाच्या आखाड्यांत प्रवेश केला. आज ती जरीच्या चौकटीचें काळें-भोर पातळ नेसली होती. काळ्याभोर कचुकीच्यावर तिच्या वक्षस्थळाचा थोडासा भाग आणि मान यांचा गौरपणा जास्त उठून दिसत होता. आज तिनें लालजरद कुंकवाची आडवी चीर लावली होती. साखरीनें खालीं उडी मारल्यावर दोघेंहि इनामदारांच्या पुढ्यांत गेले आणि त्यांनीं मुजरे केले. साखरीनें गिरेबाजपणें हसून बाळासाहेबांकडे पाहिलें.

" काय ! कालचं डोकं उतरलं कीं नाहीं ?" तिच्या हास्यानें कळी खुललेल्या बाळासाहेबांनीं विचारलें.

" उतरलं तर ! तसं औषधच घेतलं होतं मीं !" असें म्हणून अर्थपूर्ण नजरेनें तिनें त्यांच्याकडे पाहिलें आणि कबुतरासारखी गिरकी मारून कसरत करायला सुरवात केली. बाळासाहेबांचा जीव गहिरून महिरून गेला. भगतमंडळींनीं त्यांच्या पाठीवर थाप मारून त्यांचें अभिनदन केलें.

आजूबाजूच्या लोकांना मात्र हा प्रसंग जरा चमत्कारिक वाटला. त्यांनीं लिंबाजीकडे पाहिलें. त्याचा चेहरा त्यानें काल फोडलेल्या दगडाइतकाच निर्विकार होता !

खेळ चालू असतांना साखरी मधून मधून बाळासाहेबांकडे कटाक्ष टाकीत होती. त्यांना मूठमूठ मांस चढत होतें. लोकांना मात्र आज कसें-सेंच वाटत होतें. दोरावरल्या खेळांत दोन पायाच्या घोटयांमध्यें अलगद अंडें घोळवणाऱ्या साखरीनें आजपर्यंत त्या अंड्याप्रमाणेंच आपलें शील सांभाळलें होतें, ही त्यांची बालंबाल खात्री होती; आणि आज हें असें काय ! त्या अंड्याला आतां कच पडणार काय ? आतांपर्यंत कडू समजली जाणारी ही साखर इथून पुढें लोकांच्या तोंडांत विरघळणार काय ? अरेरे !

कालच्याप्रमाणेंच खेळ चालले होते. पण आदल्या दिवशीं खेळ पाहिलेल्या लोकांना वैचित्र्य वाटावें म्हणून कांहीं निराळे कार्यक्रम होते. आज लिंबाजीनें दातांत दोर धरून माणसांनीं खेचून भरलेली बैलगाडी धाडधाड ओढीत नेली. तसेंच तीच लोखंडी धावांची भरगच्च भरलेली गाडी पांचसहा कोल्हाटयांनीं लिंबाजीच्या छातीवरून नेली. लिंबाजी आज आपल्या ताकदीचे खेळ जास्त बेदरकारपणें करीत होता. दगड फोडायला नेहमीं पांचसहा मिनिटें घेणाऱ्या लिंबाजीनें आज हाताच्या चार धडका देऊन एका मिनिटांत दगडाचे तुकडे तुकडे केले !

दोरीवरले खेळ झाल्यावर एका नवीन खेळाला सुरवात झाली. एक मोठी लाकडाची फळी खेळाच्या आखाड्यांत आणून उभी करण्यांत

आली. लिंबाजीनें पंचवीसतीस तीक्ष्ण टोकांचे सुरे बाहेर काढले आणि तीनतीन चारचार सुरे हवेंत फेकून तो झेलूं लागला. नंतर तो लोकांना उद्देशून म्हणाला,

"लोकहो, आज एक नवीन खेळ तुम्हांला दाखवतों. कालच्या खेळांत साखरीला पेटाऱ्यांत घालून, तुमची नजरबंदी करून, मीं तिला भाला मारला होता; पण आज उघड उघड देखतडोळा या सुऱ्यांनीं मी तिला मारतों. असा साखरलिंबूचा खेळ (साखरीचा व लिंबाजीचा) तुम्हांला पुन्हां पहायला मिळणार नाहीं."

इतकें बोलून तो सुऱ्यांची धार पारखूं लागला. आज बोलतांना त्याचा आवाज घोगरा येत होता. ढोल थांबले होते. लोक चित्रासारखे स्तब्ध होते. तो पुढें म्हणाला,

"पहिल्यांदा तुम्हाला ह्या सुऱ्यांची धार दाखवतों. ढेप्या, इकडे ये."

शेपूट घोळीत त्याचा आवडता कुत्रा ढेप्या धावत आला. त्याच्या नजरेंत साता जन्माची भीति भरलेली दिसत होती.

"दोन पायावर उभा रहा!"

अत्यत कर्कश आवाजानें लिंबाजीनें ढेप्याला हुकूम सोडला. ढेप्या मागल्या पायावर उभा राहिला. थरथर कापत त्यानें आपल्या मालकिणी-कडे केविलवाण्या नजरेनें पाहिलें. साखरीनें दुसरीकडे मान वळवली. हा काय प्रकार आहे हें लोकांच्या लक्षांत येतें न येतें तोंच लिंबाजीच्या हातून सुरी सुटली आणि ढेप्याच्या छाताडांत आरपार जाऊन घुसली. एक आचका देऊन ढेप्यानें जागच्या जागींच प्राण सोडला. लोकांच्या अंगावर काटा उभा राहिला. अजूनपर्यंत आपल्या जनावरांना लिंबाजीनें यत्किंचितहि दुखावलेलें त्यांच्या ऐकिवांत नव्हतें; आणि ढेप्या हा तर त्याचा आवडता कुत्रा होता! शिवाय ही धार दाखवण्याची रीत कोठली!

लिंबाजीच्या डोळ्यांत खून चढला होता. त्याच्या चेहऱ्यावर शिकार टिपायला निघालेल्या शिकाऱ्याचा आविर्भाव दिसत होता. तो ओरडला,

"साखरी ! हो तिकडे."

साखरी धावत जाऊन त्या फळीच्यापुढें उभी राहिली. तिच्यापुढें ढेप्याचें कलेवर पडलें होतें. ढेप्याच्या रक्तानें साचलेल्या थारोळयांत तिच्या पायांचे अंगठे बुडाले होते. लिंबाजी सुरे परजूं लागला. हरएकाचें काळीज धडधड उडत होतें. डिवचलेल्या मोहोळांतून माशा बाहेर पडाव्यात ना, त्याप्रमाणें त्याच्या हातांतून सुरे सुटूं लागले. हवेंतून जातांना त्यांचीं पातीं लखलख करीत होतीं. त्यांच्यावर लोकांची नजर ठरेना ! साखरीच्या शरिराभोंवतीं गहूगहू अंतर सोडून ते सुरे त्या फळींत कचाकच घुसत होते. थोड्याच वेळांत तिच्याभोंवतीं सुऱ्यांचें जाळें झालें. आतां एकच सुरा राहिला. एक क्षणभर थांबून लिंबाजीनें त्या सुऱ्याकडे पाहिलें; हात वर उचलला; आणि साखरीच्या छातीवर नेम धरला. त्याच्या डोळयांत त्वेषाची खाई पेटली होती. सूं सूं करीत तो सुरा सुटला आणि...आणि साखरीच्या डाव्या दंडाला चाटून फळींत घुसला. तिची चोळी फाटली आणि दंडांतून रक्ताचा बारीक ओघळ वाहू लागला. कधीं न चुकणाऱ्या लिंबाजीचा नेम आज चुकला. तरी बरें, थोडक्यांत निभावलें !...

दोनचार कोल्हाटी पुढें सरसावले. साखरीनें त्यांना मागें होण्याची हातानेंच खूण करून ती पुढें सरकली. ढेप्याचें प्रेत ओलांडून ती पुढें आली आणि खालीं वाकून जमिनीवरची मूठभर माती उचलून तिनें ती रक्त निघणाऱ्या ठिकाणावर खसाखस चोळली. मागें वळून तिनें एकदा ढेप्याकडे पाहिलें. त्याच्या काचेसारख्या उघड्या डोळयांनीं तो अजून जणूं काय आपल्या मालकिणीची क्षमाच मागत होता. पण माझ्या पालावर पहारा करण्यांत तूं एक मिनीटभर का होईना, पण कसूर केली असून मी तुला क्षमा करूं काय ! असेंच जणूं काय ती आपल्या डोळयांनीं ढेप्याला विचारीत होती. ढेप्याला तिथून हलवण्याची

तिनें एका कोल्हाट्याला खूण केली. तो कोल्हाटी त्याच्या तंगडीला धरून त्याला फरफटत ओढीत घेऊन गेला.

लोकांच्या अंगावर शहारे आले. कोल्हाटी लोकांनाहि आजचा या दोघांचा नूर निराळाच दिसत होता. खेळाच्या आखाड्यावर आज रक्ताची शिंपड झाली होती; आणि तीहि दोनदा, दोघांच्या रक्ताची. देवभोळ्या लोकांच्या मनांत नाहीं नाहीं ते विचार येऊं लागले. इजा··· बिजा···

आतां काल शेवटी झालेले दोनच खेळ व्हायचे राहिले होते. पेटारा आखाड्यांत येऊन थडकला. हातपाय बांधण्याची लांब सुतळी घेऊन लिंबाजी पेटाऱ्याजवळ उभा राहिला. साखरीच्या दंडाचें रक्त अजून थांबलें नव्हतें. पदरानें तें रक्त पुशीत ती एका बाजूला उभी होती. थोडा वेळ थांबून लिंबाजीनें तिला हाक मारली,

“ साखरी– ”

गुरुत्वाकर्षणाचा नियम एखादे वेळीं चुकेल, पण लिंबाजीच्या हाकेला साखरीची साद चुकणार नाहीं. पण आज तसें झालें नाहीं. त्यानें मारलेल्या हाकेकडे लक्ष न देतां साखरी सावकाशपणें चालत जाऊन इनामदारांपुढें उभी राहिली व म्हणाली,

“ इनामदारसाहेब, हें बघा. ”

तिनें आपल्या चोळीचा फाटका तुकडा बाजूला करून त्यांना आपल्या गोऱ्यापान दंडावरली जखम दाखविली. ती पुढें म्हणाली,

“ आतां तुम्हीच सांगा, मी पेटाऱ्यांत कशी बसणार ? आणि या हातानें दोराचे फासे कसे सोडणार ? ”

“ आज पेटाऱ्याचा खेळ करूं नका. ”

बाळासाहेब त्या जखमेकडे पहात कळवळून म्हणाले. आजूबाजूच्या लोकांनींहि त्यांना साथ दिली. लिंबाजी अजून तसाच उभा होता. त्याच्याकडे संतापानें पहात बाळासाहेब पुढें म्हणाले,

" लिंबाजीला मी सांगतों हवं तर."

" त्यांना सांगून कांहींच उपयोग होणार नाहीं. कारण पेटाऱ्याचा खेळ आम्हांला केलाच पाहिजे. दरएक वेळेला पेटाऱ्याचा खेळ केला नाहीं तर तुमचं वाटोळं होईल, अशी आमच्या देवीची आम्हांला शपथ आहे. तरी हा खेळ झाल्याशिवाय इलाजच नाहीं." शब्दाशब्दावर जोर देत साखरी म्हणाली.

" मग दुसऱ्या कोणाला तरी पेटाऱ्यांत बसवा आणि होऊं द्या खेळ ! तुम्ही नका तसदी घेऊ." बाळासाहेब म्हणाले.

" तुमचं म्हणणं अगदीं रास्त आहे, पण पेटाऱ्यांत बसणारं माणूस राजबिंडंच असलं पाहिजे अशी आमच्या देवीची अट आहे; आणि हा खेळ आज झाला नाहीं तर आमचं वाटोळं होईल हो इनामदारसाहेब."

साखरी मुसमुस रडूं लागली. सारे लोक 'लाकडासारखे स्तब्ध होते. साखरीच्या डोळयांतून पाणी येणें म्हणजे तशीच अजब गोष्ट होती !

स.खरी राजबिंडी होती याबद्दल कुणालाच शंका नव्हती; पण आतां या पेचांतून सुटायला मार्ग कोणता ? कोणालाच कांहीं सुचेना. डोळे पुसून साखरी पुढें म्हणाली,

" इनामदारसाहेब, आतां याला एकच उपाय आहे. दुसरं राजबिंडं माणूस आताच्या आतां मिळालं तरच काम होईल. त्यांत धोका कांहीं नाहीं हें काल सगळ्यांनीं पाहिलंच आहे. आणि इनामदारसाहेब, या हजारों लोकांच्या गर्दीत दोनच राजबिंडीं माणसं आहेत. एक मी आणि ...तुम्ही !"

ऐकण्याच्या टप्प्यांत असलेल्या लोकांना एकदम धक्का बसला. त्यांची कुजबूज सुरू होण्यास अवकाश न देतां साखरीनें अत्यंत गोड हास्य करून बाळासाहेबांकडे पाहिलें आणि दीनवाण्या स्वरांत ती म्हणाली,

" मालक, मी असली भीड तुमच्यासारख्या मोठ्या माणसाला घालूं नये; पण माझ्यासाठीं...माझ्यासाठीं एवढं कराल का ! "

साखरीचें तें हास्य आणि ती केविलवाणी नजर पाहून बाळासाहेब विरघळले. बाळासाहेब म्हणजे मोठा निधड्या छातीचा इसम होता. भीति कशी ती त्यांना ठाऊक नव्हती. प्रश्न एवढाच होता, कीं कोल्हाट्यांच्या खेळांत आपल्यासारख्या इनामदारानें भाग घ्यावा किंवा नाहीं. पण साखरीच्या साखरकटाक्षानें ते आपली इनामदारी विसरले. ते ताड्दिशीं उठून उभे राहिले आणि कैफांत आलेल्या माणसाप्रमाणें साखरीजवळ जाऊन म्हणाले,

" माझ्याकडे लागलें तें. चल !"

" चला, मी तुम्हांला ती युक्ति सांगते !"

त्यांचा हात धरून साखरीनें त्यांना बाजूला नेलें आणि त्यांच्या कानाजवळ तोंड नेऊन कायसेंसें सांगितलें. बाळासाहेबांनीं मान हलवली. नंतर दोघेहिजण पेटाऱ्याजवळ आले. साखरीनें त्यांचा हात अजून आपल्या हातांत ठेवला होता. तो हलकेच काढून घेत ती मुरकत मुरकत म्हणाली,

" पण आमची युक्ति नंतर कुणाला सांगणार नाहीं ना ! तसं कराल तर माझ्या गळ्याची शपथ आहे तुम्हांला."

" छे, छे !"

लिंबाजीनें पुढें होऊन एका मिनिटांत त्यांचे हात करकचून बांधले आणि त्यांची मोटली पेटाऱ्यांत टाकून वरून झाकण लावून घेतलें. कांहीं तरी चुकत आहे असें लोकांना वाटत होतें; पण चाललेल्या प्रकाराला अडवण्याची कुणालाच छाती झाली नाहीं. साखरीच्या देवीनें जणूं काय त्यांना मंत्रानें भारून टाकलें होतें ! धार पहाण्याच्या भानगडींत न पडतां लिंबाजीनें भाला सरसावला; कोल्हाट्यांना ढोल बडवायला सांगितलें; आणि तो भाला चेवून पेटाऱ्यांत खुपसला. लोकांना पेटारा जरा हलल्यासारखा दिसला. ढोलक्यांचा धुम्म धुम्म आवाज होत होता.

ढोलकी थांबविण्याची हातानें खूण करून साखरी पेटाऱ्याजवळ गेली आणि झाकणाला तोंड लावून बोलूं लागली,

"इनामदारसाहेब, यायचं का बाहेर? कां! आतांच कां नको? वाड्यावर जाऊन येतां होय! बरं! पण लौकर या हं. मी तोंपर्यंत सुयांचा खेळ करतें. शेवटच्या थाळयाला तुम्ही हजर पाहिजे."

मागें फिरून तिनें सुया बाहेर काढल्या आणि मातींत रोवल्या. लोकांमध्यें गडबड सुरू व्हायला लागली होती. एक शब्दहि न बोलतां तिनें आपल्या शरिराची कमान करायला सुरवात केली. डोळे सुयांच्याजवळ आले, भिडले. डाव्या बाजूची सुई कशी काय जणं, पण पापणीच्या पकडींत न सापडतां बाजूला पडली. आज खेळाला मुहूर्तच चांगला लागला नव्हता. सगळेच खेळ हुकत होते! त्या सुईचा नाद सोडून उजव्या डोळ्यानें ती दुसरी सुई उचलूं लागली. आणि हें काय? दडाला कळ आली वाटतं! साखरी आणखी खालीं कां वांकली? अरे बापरे!

साखरी उभी राहिली. तिचा उजवा डोळा रक्तबंबाळ झाला होता. तिच्या तोंडावर रक्ताचे ओघळ वाहत होते. साखरीचा डोळा फुटला असा लोकांमध्यें एकच हलकल्लोळ झाला. लोक या क्षणाला इनामदारांना पूर्ण विसरून गेले; आणि लिंबाजी कुठें होता? साखरीच्या तोंडावरचें रक्त पुसायचें कोणीं? लिंबाजी, अहो लिंबाजी कुठें आहे?

उजव्या डोळयाला हात लावून साखरी तीरासारखी धावत सुटली. कोल्हाटी लोक नुसते आ वासून पहात राहिले. साखरी गर्दींत शिरली. लोकांनीं भराभर बाजूला सरून तिला वाट करून दिली. साखरी गर्दींतून बाहेर पडली. लोकांनीं माना वळविल्या. घोड्याचा लगाम हातांत धरून लिंबाजी उभा होता. धावत जाऊन साखरीनें घोडयावर उडी मारली. ताड्दिशी उडी मारून लिंबाजी तिच्यामागें बसला आणि त्यानें घोड्याला टाच मारली. सडकेच्या रस्त्यावरून घोडयांच्या टापांचा आवाज येऊं लागला.

टप् टप् टप्...

सुमारें अर्ध्या तासानें एका आडरानांत लिंबाजीनें घोड्याचा वेग कमी केला. त्याच्या डाव्या हातांत लगाम असून उजवा हात त्यानें साखरीच्या कमरेभोंवतीं गुंडाळला होता. घोड्याच्या तोंडांतून फेस खालीं सांडत होता. अंधार दाटत चालला होता.

रक्तानें बरबटलेलें आपलें भेसूर तोंड लिंबाजीकडे वळवून साखरी दात खात म्हणाली,

" त्या मांगानं विटाळलेला माझा डोळा मीं फोडून टाकला. मी झोपेंत नसतें तर तेवढंहि करायची त्या मेल्याची ताकद नव्हती! आणि ढेप्यासुद्धां... "

तिला मध्येंच थांबवून लिंबाजी म्हणाला,

" जाऊं दे. झाल्या गेल्या गोष्टी त्या! तूं त्रागा करूं नकोस आतां. "

त्याच्या आवाजांत मायेची कातरता होती. साखरी शांत होऊन जराशानें म्हणाली,

" पण लिंबा, माझ्या लिंबा! मी तुला आता पहिल्यासारखी सुंदर दिसेन का रे? "

" माझी साखर मला पहिल्यापेक्षांहि जास्त गोड आहे. "



## गाभुळी चिंच २

तसं पाहिलं तर मनाजोगती बायको मिळणं म्हणजे कांहीं सोपी बाब नाहीं. मोठें घराणें, गडगंज पैसा, उच्च शिक्षण, चांगली नोकरी, मोहक चेहरा या गोष्टींची अनुकूलता असेल तर तशी आशा करायला थोडीफार जागा असते. माझ्या बाबतींत या सर्व गोष्टींचा ठणठणाट होता. रहायला टाकळीसारख्या लहान खेड्यांतलें एक झाप, बाप एक गरीब शेतकरी, शिक्षण व्ह. फा. पर्यंत झालेलें आणि नोकरीचें तर नांवच काढूं नका. अशा परिस्थितींत माझ्यासारख्या तरुणानें मनाजोगती बायको मिळण्याची कशी आशा करावी ? नाहीं म्हणायला लहानपणापासून मेहनत केलेलें पिळदार, बांधेसूद व उंचेपुरें शरीर एवढेंच माझें भांडवल होतें. पण जगांत पैलवान काय थोडे आहेत ! मनाजोगती तर बाजूलाच राहिली, पण बायकोही मिळायची पंचाइत पडते त्यांना.

पण तुम्ही विचाराल, मनाजोगती बायको म्हणजे कशी ? प्रश्न कांहीं वावगा नाहीं. कारण, कांहीं लोकांना नुसती बायको मिळाली म्हणजे ती मनाजोगतीच असते, तर कांहीं लोकांना इंद्राची अप्सरा मिळाली तरी मनास येत नाहीं. हा ज्याच्या त्याच्या आवडीचा प्रश्न आहे. कॉलेज-मधल्या एखाद्या तरुणाला विचारलें तर तो म्हणेल, 'जिच्यावर प्रेम बसेल ती.' परंतु मशारनिल्हा तरुण प्रत्येक गल्लीच्या कोपऱ्यावरून वळ-तांना प्रेमांत सापडलो. तेव्हां प्रेम बीम सब् झूट आहे. मनाजोगती म्हणजे जी एकदां मनांत भरते आणि पुन्हां तिथून हलत नाहीं ती, एवढेंच मला सांगतां येईल.

माझ्या मनांत एकच मुलगी भरली होती; आणि ती म्हणजे आमच्या गांवच्या सरदार टाकळीकरांची एकुलती एक मुलगी सू. गांवातले झाडून सारे लोक तिला सुलोचना ताईसाहेब असें म्हणत. तिला सू म्हणून हाक

मारणारे फक्त आम्ही दोघे. एक तिचे वडील सरदार टाकळीकर—आम्ही त्यांना तात्या म्हणत असूं—आणि दुसरा मी. कारण, मी तिचा लंगोटी-मित्र—छे, परकरमित्र होतों. तुम्ही शंका घ्याल कीं, माझ्यासारखा एक गरीब शेतकऱ्याचा मुलगा सरदारांच्या मुलीचा खेळगडी कसा ! तर त्याचें कारण असें कीं, तात्यांना शिकारीचा फार नाद होता. माझे बाबा कांहीं दिवस पलटणींत असल्यामुळें त्यांना बंदूक कशी धरावी तें माहीत होतें. टाकळीसारख्या गांवांत तेवढाच एक बंदूकवाला असल्यामुळें तात्या बाबांना घेऊन शिकारीला जात; आणि म्हणून मलाहि तात्यांच्या वाड्यांत मज्जाव नसे.

सू आणि मी खूप खेळत असूं. मला सूशिवाय करमत नसे, पण दुसरं तसं कांहीं त्या वेळीं माझ्या मनांत नव्हतं. एक दिवस काय झालं कीं, शिकारीहून परत आल्यावर बाबा अंथरुणावर खिळून पडले. तात्यांच्या अंगावर वाघ झेप घालीत असतांना बाबांनीं ती आपल्या अंगावर घेतली होती. बाबांच्या अंगाची चाळण झाली होती. तात्या आमच्या घरीं रोज येऊन बाबांच्या जवळ तासन्‌तास बसून राहत. एके दिवशीं तर बाबांनीं धीरच सोडला. शेजारच्या गांवाहून डाक्तर आणला होता. त्या दिवशीं तात्या बाबांचा हात हातांत धरून गहिंवरून म्हणाले,

“ साबाजी, तूं कांहीं काळजी करूं नकोस. नानाला ( म्हणजे मला ) मी पोटच्या पोरासारखा सांभाळीन; आणि अजूनही तुला शंका वाटत असल्यास माझी सू तुझ्या नानाला देईन अन् त्याला घरजावई करून घेईन, असं तुला आतां वचन देतों. मग तर झालं ! ”

बाबांचं तोंड आनंदानें फुलून गेलं. कारण, तात्या म्हणजे आपल्या वचनाला जागणारा नेकीचा जातिवंत मराठा आहे, ही त्यांची खात्री होती. पडवीच्या अडोशाला उभा राहून मी हें संभाषण ऐकत होतों. त्या वेळीं मला काय वाटलं अन् काय नाहीं हें मला आतां सांगतां येत

नाहीं. जराशानं बाबांना झोप लागली आणि महिन्याभरातच ते हिंडूं फिरूं लागले.

तात्यांचे ते शब्द वारंवार माझ्या कानांत घुमत असत. एक दिवस सूशीं बोलतां बोलतां मी ही बातमी तिच्या कानांवर घातली. राहवेनाच मला. हें ऐकल्याबरोबर कपाळावर सतराशेंपन्नास आठया घालून तिनें मला ' धुडुत् ' केलें आणि ती तात्यांच्याजवळ जाऊन रडत बसली. तेव्हां-पासून सू माझ्याशीं फणकाऱ्यानें वागूं लागली. आमचें खेळणें बंद पडलें. पण त्या वेळीं सू आणि बायको या दोन शब्दांची माझ्या मनांत जी सांगड बसली ती कायमचीच !

तात्यांनीं पुन्हां शिकारीचें नांव घेतलें नाहीं. बाबांनीं परत शेतकामाला सुरवात केली. मी शाळेंत एक एक बुक शिकत होतों. सूनें माझ्याशीं कट्टी केल्यामुळें मी वाड्यावर जाणें बंद केलें. मास्तर वाड्यावर जाऊन सूला शिकवीत असत. अशा रीतीनें कांहीं दिवस गेल्यावर एकाएकीं तात्यांनीं टाकळीचा मुक्काम हलवला आणि पुण्याला जाऊन बिऱ्हाड केलें. जाण्या-पूर्वी त्यांनीं बाबांची गांठ घेतली, पण मला कांहीं सूचें तोंड दिसलें नाहीं.

अशीं बरींच वर्षे गेलीं. कसेंबसें व्ह. फा.च्या परीक्षेचें कुंपण ओलांडून मी मोकळा झालों. इतक्या वर्षांत सूची व तात्यांची खबरही टाकळीला आली नव्हती. परिक्षा होईपर्यंत मला कांहींच वाटत नव्हतें, पण परिक्षा संपून घरीं रिकामा बसून राहिल्यावर सूची आठवण होऊन मन बेचैन होऊं लागलें. मला मिसरुड फुटली होती. लोकांच्या दृष्टीनें माझें पोरपण जाऊन मी बाप्या झालों होतों. सू आतां केवढी झाली असेल ! कशी दिसत असेल ! तिला या नानाची कुठली आठवण व्हायला !

मी नांगर हातांत धरून बाबांना शेतकामाला मदत करावी कीं, बोर्डाच्या शाळेंत मास्तर व्हावें हा माझ्यापुढें मोठा प्रश्न होता. शेजारी-पाजारी म्हणत होते, ' कर नोकरी.' बाबा मुग्धच होते. एकवार पुण्याला जाऊन सूची व तात्यांची गांठ घ्यावी अशी फार इच्छा होती माझी.

पण बाबांना हें कसें विचारावें ? एक दिवस बाबांनींच ती गोष्ट काढली, ते म्हणाले,

"नाना, तूं एकदां पुण्याला जाऊन ये. तूं मास्तरकी करावीस असें कांहीं माझें मन घेत नाहीं. आणि जन्मभर नांगर हातांत धरून मी काय कमावलें आहे, म्हणून तुला तसें करायला सांगूं ! तात्यांच्या सल्ल्यानें पुढें काय करायचें तें तूं ठरव."

माझा आनंद टाकळींत मावेनासा झाला. एका पत्र्याच्या पेटींत माझें सामान भरून मी पुण्याला निघालों. आमच्या गांवापासून स्टेशन पांच-सहा मैल होतें. आईनें दशम्या बांधून दिल्या होत्या. स्टेशनवर पुण्याचें तिकीट काढून मी गाडींत बसलों. पुणें जसजसें जवळ येऊं लागलें तसतसें मला ब्रह्मांड आठवूं लागलें. बाबांनीं तात्यांचा पत्ता आणि पुरेसे पैसे मजजवळ दिले होते. टांग्यांतून उतरून मी पुण्यांतल्या सरदार टाकळीकरांच्या वाड्यासमोर उभा राहिलों. डोक्यावर भला मोठा फेटा, अंगांत मलमलचा पेहरण, खालीं दुहेरी काठ्या मारलेलें सोलापुरी धोतर आणि पायांत कोल्हापुरी खंगरी वहाणा, असा माझा त्या वेळचा अवतार होता.

देवडीवाल्याजवळ सामान ठेवून मी वर गेलों. तात्या वर्तमानपत्र वाचीत खुर्चीवर बसले होते. मी पुढें जाऊन त्यांना नमस्कार केला. तात्यांनीं मला ओळखलें व मला पोटाशीं धरून त्यांनीं माझें प्रेमानें स्वागत केलें. त्यांनीं बाबांची खुशाली विचारली. जरा इकडचें तिकडचें बोलणें झाल्यावर ते मला सूनच्या खोलीकडे घेऊन गेले.

आतां सू दिसणार. काय बोलावें व कसें वागावें या विचारांनीं माझा फार गोंधळ उडाला होता. जीव मुठींत धरून मी चाललों होतों. तात्यांनीं हाक मारली 'सू.' आंतून 'काय तात्या ?' असा आवाज आल्याबरोबर माझ्या सगळ्या अंगाला मुंग्या आल्या. सूनें दार उघडलें. माझ्या डोळ्यांपुढें चकचक लखलख झालें. हीच का ती सू ? ती कशी दिसत होती याचें काय वर्णन करूं ? पोषाखाच्या बाबतींत बोलायचें झालें तर पुण्या-

तल्या मुलींचा तो अगदीं आजतागायतचा पोशाख असावा एवढेंच मला सांगतां येईल. आणि तिच्या पोशाखाकडे लक्ष द्यायला मीच ठिकाणावर कुठें होतों ! खरें सांगायचें म्हणजे ती त्या वेळीं काय काय बोलली आणि अस्मादिक कसें काय वागलें हें माझ्या कांहींच लक्षांत नाहीं. एवढें मात्र खरें कीं, सूच्या वागण्यांत तात्यांनीं दाखवला तितका आपलेपणा मुळींच नव्हता.

त्याच दिवशीं तात्यांनीं मला बाजारांत नेऊन चांगल्यापैकीं कपडे शिवायला टाकले. थोडयाच दिवसांत माझा संकोच कमी होऊन मी तिथें घरच्या माणसासारखा राहूं लागलों.

दिवसांमागून दिवस चालले होते. दोन वेळ खावें, मोटारींतून इकडे तिकडे भटकावें, तात्याशीं गप्पागोष्टी कराव्यात व सापडेल तेवढा वेळ सूच्या संगतींत घालवावा, असें चाललें होतें माझें. पोशाखाच्या व वागण्याच्या बाबतींत सूची फार कडक शिस्त होती. तिला आवडेल तसें वागायचें हें धोरण मी ठेवलें होतें. टाकळीची आठवणही होत नव्हती मला. पण एकदां लाजेकाजें मी तात्यांजवळ टाकळीला जाण्याची गोष्ट काढली. ओघानेंच मी पुढें काय करावें हाहि प्रश्न निघाला. तो प्रश्न तसाच ठेवून तात्यांनीं मला टाकळीला जाण्याचें नांव काढूं नकोस, असें सांगितलें. इंग्लिश शिकविण्यासाठीं मला घरच्या घरीं मास्तर ठेवण्यांत आला. सू शाळेंत जात असे तेवढ्या वेळांत मी अभ्यास करुन त्या विषयांत प्रगति करायला सुरवात केली.

असे बरेच दिवस गेले. मी पुणेरी होऊं लागलों. माझा खेडवळपणा पार नाहींसा झाला. आतां बारा तास पायांत बूट आणि गळ्याला टाय बांधून ठेवण्याची मला सवय झाली. कपड्यांची इस्तरी बिघडली तर माझ्या कपाळावर आठ्या पडूं लागल्या. बशीनें चहा पिणें मी कमी-पणाचें समजूं लागलों. सँडविचेस कशा खाव्यात हें मी लोकांना शिकवूं लागलों. टेबलावर काट्याचमच्यानें सफाईनें जेवणें हा माझ्या हातचा

मळ झाला. मोटारचें व्हील एका हातांत ठेवून मला भर रस्त्यांतून मोटार हाकतां येऊं लागली. तुटपुंज्या इंग्लिशच्या ज्ञानावर मी गोटमॅट करूं लागलों. सकाळीं उठल्याबरोबर टाइम्सचा अंक तोंडासमोर धरणें हें माझें नित्यकर्म झालें. एकंदरींत फारच थोड्या अवधींत सुरवंटाचें फुलपांखरूं झालें.

सूच्या व माझ्या बाबतींत तात्या काणाडोळा करीत असत. आम्हांला पूर्ण स्वातंत्र्य होतें. पण सूची वागणूक सगळयांच्या बाबतींत सारखी असे. ती फारशी हसत नसे. हसलीच तर अगदीं गालाच्या कोपऱ्यांत. फारशी बोलतही नसे; अगदीं मामुली स्वरूपाचें. मी इतका वेळ तिच्याभोंवतीं लुडबुड करी, पण हवापाणी, अभ्यास व रोजच्या व्यवहारांतील गोष्टी याखेरीज तिनें गप्पा केल्या नाहींत. तिच्या हृदयाचा कोपरा मला नंदादेवी शिखराइतकाच अज्ञात होता. आणि आतां नंदादेवीचें नांव निघालेंच आहे, तर सांगतों. सू माझी देवी होती आणि माझ्याशीं वागण्याच्या बाबतींत ती अगदीं नंदादेवीच्या शिखरावरील बर्फासारखी होती. 'To break the ice' ही म्हण मी नुकतीच शिकलों होतों; आणि हें बर्फ कसें फोडावें हा प्रश्न मला कधींच सुटला नाहीं.

मी तिला आवडत नव्हतों कां ? नाहीं, तसें नाही म्हणतां येत. बरं ! मी तिला आवडत होतों कां ? छे, तसेंही नाहीं सांगतां येत. बाजरीचें शेत पिकून त्याला गच्च फुलवरा यावा, तसें माझें मन तिच्या विचारांनीं भरून गेलें होतें. पण तिचें मन ! खोल पाणी असलेल्या चिचोळ्या विहिरीचा तळ जसा कधींच दिसत नाहीं, तसें होतें तिचें मन. एखादा सूर्यकिरणाचा कवडसा येऊन तो तळ दिसावा, यासाठीं माझी केवढी धडपड ! पण तें कांहीं जमत नव्हतें. तिला खूष ठेवण्यासाठीं मी फार जपत असे. एके दिवशीं एका नोकराबरोबर गप्पा मारीत असतांना तिनें मला पाहिलें व आपली डावी भिवई वर चढवली. तेव्हांपासून मी नोकरांच्या बरोबर कामाशिवाय बोलेनासा झालों. सूची इच्छा ही माझी पुंगी

होती. ती पुंगी जशी वाजेल तसा मी डुलत होतों. पण असें हें कुठपर्यंत चालणार !

हां हां म्हणतां चार वर्षें निघून गेलीं. एखादे वेळेस माझ्या मनांत विचार येई. बाबांच्या अंगावर झेप टाकलेल्या त्या वाघानें माझ्यावर किती उपकार केले आहेत ! नाहीं तर मी असा बगीच्यांत येऊन पडलों असतों कां ! पण त्या गोष्टीचा मी अवास्तव फायदा घेत आहे. तात्या त्या वेळीं बाबांच्याजवळ बोलून गेले म्हणून मी सूचा इतका पिच्छा पुरवावा का ! आणि तसें तिच्या मनांत नसलें तर ! कारण अजूनहि ती तराजू घेतल्याखेरीज माझ्याशीं हसत व बोलत नाहीं. तात्यांना तरी ही गोष्ट मनापासून पसंत आहे का ! यापेक्षां सरळ टाकळीला जाऊन नांगर हातांत धरावा. पण सूच्या सहवासाच्या जादूनें मी इतका भारून गेलों होतों कीं, असले हे विचार आले कीं, उन्हाळी ढगांप्रमाणें ते ताबडतोब विरून जात.

अचानकपणें एके दिवशीं बाबांचें पत्र आलें. त्यांची तब्येत एकाएकीं बिघडल्यामुळें त्यांनीं आम्हां सगळ्यांना एकदां भेटायला बोलावलें होतें. चार वर्षें आपण बापाची हयगय केली म्हणून माझें मन मला खाऊं लागलें. तात्याहि अलिकडे थकल्यासारखे झाले होते. तें पत्र वाचल्यावर तात्यांनीं सूला व मला दोघांना टाकळीला जाण्याची तयारी करा म्हणून सांगितलें. संधिवाताच्या व्यथेमुळें त्यांना प्रवासाचा त्रास निभणें शक्य नव्हतें. इतक्या वर्षांनीं टाकळीला जायचा योग आल्यामुळें माझें मन उतावळ्या आनंदानें भरून गेलें. मी प्रवासासाठीं लगबगीनें सामानाची आवराआवर करूं लागलों. सूच्या चेहऱ्यावर कांहींच फरक दिसला नाहीं. ती धीमेपणानें निघण्याची तयारी करूं लागली. आम्ही दोघे येत आहोंत असें पत्र तात्यांनीं बाबांना लिहिलें.

रात्रीच्या गाडीनें निघायचें ठरलें होतें. मोटारमध्यें बसून आम्ही दोघे स्टेशनवर आलों. टाकळीला गेल्यावर काय काय करायचें यासंबंधीं मी

सारखी बडबड करीत होतों. सूचा चेहरा नेहमींप्रमाणेंच संगमरवरी होता. इंटरचीं तिकिटें काढून आम्ही गाडींत शिरलों. गाडींत फारशी गर्दी नव्हती. मी बर्थवर होल्डऑल पसरून दिले. रजई अंगावर घेऊन सू पडून राहिली. तिला लगेच झोप लागली. भल्याबुऱ्या विचारांनीं संत्रस्त होऊन मी डब्यांतल्या डब्यांत येरझारा घालीत राहिलों. बऱ्याच वेळानें मला झोप लागली.

सकाळच्या प्रहरीं आम्हीं स्टेशनवर उतरलों; हमालाच्या डोक्यावर आमचें सामान दिलें; व स्टेशनच्या बाहेर पडलों. गाडीला बैल जुंपून स्टेशनच्या आवारांत आमचा नेहमींचा गडी भिकाजी स्टेशनमधून बाहेर पडणाऱ्या उतारूंचे चेहरे न्याहाळीत उभा होता. मी त्याला उंच आवाजांत हाक मारली. तो पुढें सरकला. साहेबमडमिनीसारखा पोशाख केलेल्या आम्हांला पाहून त्याचा त्याच्या डोळ्यांवर विश्वास बसेना. मी पुढें होऊन त्याच्या पाठीवर थाप मारली, तेव्हां हाच आपला नाना, ही त्याची खात्री पटली. हमालानें गाडींत सामान टाकल्यावर आम्ही गाडींत बसलों. बाबांची तब्येत कशी काय आहे असें त्याला विचारतां, घाबरण्यासारखं कांहींच नाहीं असें त्यानें सांगितलें व माझा जीव भांड्यांत पडला. त्यानें गाडी हाकायला सुरवात केल्याबरोबर गांवांतल्या इतर बाबींसंबंधीं मी त्याच्यावर प्रश्नांची सरबत्ती सोडली. अजूनहि त्याची भीड चेपली नसल्यामुळें तो थबकत थबकत उत्तरें देत होता. भोंवतालच्या सृष्टिसौंदर्याकडे पहात सू स्तब्धपणें बसली होती.

अशा प्रकारें अर्धा रस्ता गेल्यावर आम्हांला खोलगटींतली टाकळी दुरून चित्रांतल्या गांवाप्रमाणें दिसूं लागली. कळ्यावरून उडी टाकणाऱ्या लोंढ्याप्रमाणें माझ्या मनोवृत्ति उचमळूं लागल्या. भिकाजीला मागें सरकायला सांगून मी त्याच्या हातांतलें दावें घेतलें आणि बैलांच्या शेपट्या पिळल्या. बैल चौखूर धावूं लागले. मी मोठमोठ्यानें, 'ह्या ह्या' असें ओरडत होतों. गाडी खाड खाड असा आवाज करीत वाऱ्यासारखी पळूं

लागली. मध्यंतरीं मी एकदां मागें वळून पाहिलें. सू चमत्कारिक नजरेनें माझ्याकडे पहात होती. तिला चांगलेच हदरे बसत होते. पण बैलांना आवरण्याचें माझ्या अगदीं जिवावर आलें. गांवची वेस व मारुतीचें देऊळ दिसूं लागलें होतें. मी चाबकानें बैलांना ढोसलें व पुन्हां मागें वळून पाहिलें नाहीं.

गांवाच्या सीमेला लागूनच आमचें घर व शेत होतें. मी गाडी थेट दारापुढें नेऊन उभी केली. घरांतलीं व शेजारपाजारचीं माणसें दाराबाहेर आमची वाट पहात उभीं होतीं. बाबाहि अंथुरणावरून उठून बाहेर येऊन बसले होते. गाडींतून धाडदिशी उडी मारून मी बाबांना मिठी मारली; आईला भेटलों व तसाच बाकीच्या माणसांशीं बोलत उभा राहिलों. सूकडे माझें लक्षच गेलें नाहीं. ती गाडींत बसून राहिली होती. आईनें पुढें होऊन तिला घरांत बोलावलें तेव्हां मी तिच्याकडे पाहिलें. तिचा चेहरा लालबुंद आणि घामानें ओला झाला होता.

आईनें चुलीवर चहाचें आधण ठेवलें. मी माझे साहेबी कपडे उतरले व साधे कपडे घातले. सू तशीच बसून राहिली होती. मी तोंड भरून सारखा बोलत होतों. घरट्यांत परत आलेल्या पांखराची चिंवचिंव होती ती. चहा तयार झाला. घरांत एकच कपबशी होती. तिच्यांत चहा ओतून सूपुढें ठेवण्यांत आला. माझ्यापुढें चहाचा थाळा आला. थाळा तोंडाला लावून मी तो भुरकून भुरकून पिऊं लागलों. तशा पद्धतीनें चहा पीत असतांना मी सूकडे पाहिलें. ती कपानें वेडेवाकडें तोंड करून चाखतमाखत चहा पीत होती. नंतर आम्ही आलों ही बातमी गांवांत पसरल्यामुळें गांवांतले लोक हळूं हळूं येऊं लागले. बराच वेळ गप्पा छप्पा झाल्या. माझ्या जिभेवरलें चार वर्षांचें दडपण फारच थोडया अवधींत कमी होऊन मी हेल काढून खेडवळ भाषेंत त्यांच्याशीं बोलत होतों. सूचें घरांतलें अस्तित्व मी पूर्णपणें विसरून गेलों होतों.

जरा्यानें जेवणाची तयारी झाली. आलेले लोक उठून गेले होते.

पाटाऐवजीं घोंगडें पसरून आम्ही जेवायला बसलों. सरदार टाकळीकरांची मुलगी पाव्हणी आलेली व मीहि इतक्या वर्षांनीं घरीं आलेलों असल्यामुळें वरणभात, चपाती व डिंगऱ्यांची भाजी असा खासा बेत होता. सू अवघडल्यासारखी बसून एक एक घास कसावसा घशाखालीं लोटीत होती. मी चपाती कुस्करून त्यावर वरण ओतलें व काला करून फुरके मारावयास सुरवात केली. एवढेंच नव्हे तर मी आईकडून भाकरीहि मागून घेतली व तिखट व तेल घेऊन त्याच्याबरोबर त्या भाकरीवर मोठ्या आवडीनें ताव मारला. सूनें माझ्याकडे पाहणेंहि सोडून दिलें होतें. आम्ही आल्यापासून आई सारखी सूच्या पुढें पुढें करीत होती, पण मान हलवण्यापलीकडे तिनें कांहींच केलें नव्हतें.

जेवण झाल्यावर होल्डऑल पसरून सू लवंडली व मी बाबांशीं गप्पा मारीत बसून राहिलों. बाबांची तब्येत बरी असल्यास लगेच रात्रींच्या गाडीनें निघून या, असें तात्यांनीं सांगून ठेवलें होतें. मी रात्रीं जाण्याची गोष्ट काढली. बाबांनीं त्याला संमति दिली. असें लगेच निघून जाणें माझ्या जिवावर आलें होतें. पण तात्या वाट पाहतील, त्यांचें मन मोडणें बरें नाहीं, असें बाबा म्हणाले व आमचा रात्रीं निघण्याचा बेत कायम झाला.

दुपार टळली. सू जागी झाली होती. बाबा तिच्याशीं जरा वेळ बोलले आणि रात्रीं जायचें असल्यास जा, असें त्यांनीं तिला सांगितलें. आणि हो ! आतां आठवलें. मी सूशीं सकाळपासून चकार शब्दहि बोललों नव्हतों. माझें मन मला खाऊं लागलें. मी तिच्याजवळ जाऊन म्हणालों,

"जरा शेतांतून फिरून येऊं आपण. तेवढाच पाय मोकळा होईल. चलायचें कां ?"

"हो !"

आम्ही दोघे बाहेर पडलों. आमच्या सर्व शेतांतून आम्ही बराच वेळ भटकलों. मीं मधून मधून बोलत होतों. सू मुकाट्यानें चालत होती.

तिच्या कपाळावर आठ्यांचें जाळें पसरलें होतें. इतक्या वर्षांनीं स्वतांच्या गांवीं परत आल्याची माझी नशा अजून उतरली नव्हती. शिवाय हाडा-पेरानें शेतकरी असलेला मी स्वतांच्या जमिनीवरून फिरत होतों. तिच्या नाखुषीची दखल करण्यासारखी माझ्या मनाची परिस्थिति नव्हतीच मुळीं! भरगच्च पिकांनीं भरलेलीं व संध्याकाळच्या गार वाऱ्यानें डुलणारीं शेतें पाहून माझें मन उत्साहानें व आनंदानें भरून गेलें होतें. तोंडानें एक खेडवळ गाणें गुणगुणत मी झपाझप पावलें टाकीत पुढें चाललों होतों. ठेंचाळत व थबकत सू हळूंहळूं मागून येत होती.

एका शेतांत आमच्या गड्याची मुलगी भीमा गोफण फिरवून पाख-रांना हाकारा घालीत होती. मी तिच्याजवळ जाऊन तिच्या हातांतली गोफण घेतली व दोनचार गोफणीच्या फेकी केल्या. सूं सूं करीत माझ्या गोफणींतून पळणारे धोंडे आणि 'हर्र हर्र हू हू' असा मी उंच आवाजांत केलेला पुकारा यानें शेतावर आलेलीं सर्व पांखरें हां हां म्हणतां उडून गेलीं. सू स्तब्ध उभी राहिली होती. गोफण भिमीच्या हातांत परत देऊन मी गुणगुणत विहिरीकडे वळलों. मोटा बंद होत्या. आसपास कोणीहि नव्हतें. सू सावकाशपणें चालत येऊन विहिरीजवळच्या चिंचेखालीं एका दगडावर बसली.

त्या रुंद विहिरींतलें तें हिरवेंगार नितळ पाणी पहातांच मला पोह-ण्याची हुक्की आली. एवीतेवी सू बोलतहि नव्हती. शिवाय चार वर्षे पोहायला मिळालें नव्हतें. मग काय करणार! अंगावरले कपडे बाजूला फेकून देऊन मी विहिरींत उडी मारली. धोतराच्या आंत लंगोट होताच. मी मारलेल्या त्या मुटक्यानें पाणी इतकें उंच उडालें कीं, मी मारलेली उडी पाहण्यासाठीं सू विहिरीच्या कांठाजवळ येऊन उभी राहिली होती, तिच्या अंगावर पाण्याचा एक हबका बसला व तिचें जॉर्जेटचें पातळ ओलें चिंब झालें.

पंधरावीस मिनिटें विहिरींत डुंबल्यावर कंगोऱ्यांना धरून मी वर चढून

आलों. सु माझ्याकडे पाठ करून चिंचेच्या झाडाकडे पहात उभी होती. तिचे ओले कपडे तिच्या अंगाशीं चिकटून बसले होते. खरें म्हटलें तर, आतां तरी पश्चात्ताप होऊन मी तिच्याशीं आर्जवानें बोलायला हवें ना! पण नाहीं, माझ्या अंगांत मूर्तिमंत अवखळपणा शिरला होता. मीहि त्या चिंचेच्या झाडाकडे पहात उभा राहिलों.

मोठमोठ्या चिंचेच्या आकड्यांनीं तें झाड लहडून गेलें होतें. चिंचा पाडाव्यात म्हणून भोंवतीं पाहिलें तर दगडाचा एकहि दाणा दिसेना. सगळीं ढेकळेंच ढेकळें! हाताला लागणाऱ्या फांद्या केव्हांच रिकाम्या झालेल्या होत्या. कपडे न घालतां मी चिंचेच्या झाडावर सर सर चढावयास सुरवात केली. एका वरच्या फांदीवर बसून मी चिंचा खाऊं लागलों. सु वर मान करून माझ्याकडे बराच वेळ पहात होती. शेवटीं तिला राहवेना. ती म्हणाली,

"नाना!"

"काय?"

"मला चिंचा टाक ना."

"अं हं!"

"असं काय करतोस रे?"

एक गाभुळी चिंच सोलून ती चोखीत चोखीत मी तिला टुक टुक माकड करूं लागलों.

"नाना, तुला माझी शपथ आहे. एक तरी चिंच टाक की."

"काय देशील मला?"

"काय वाटेल तें देईन."

"पहा बरं!"

"हो, पाहिलं. काय वाटेल तें देईन."

चिंचेचा एक झुबका तोडून मी सरसरदिशीं खालीं उतरलों व तिच्यापुढें आऊन उभा राहिलों. तिच्या नाकापुढें तो झुबका धरीत मी म्हणालों,

" चिंचा खाणें चांगलें नाहीं सू. यानें तब्येत बिघडते. शिवाय तूं पडली नाजूक. नकोच तें."

त्या झुबक्यातली एक गाभुळी चिंच सोलून मी ती तोंडाला जास्त पाणी आल्याचा आवाज करीत खाऊं लागलों. तो झुबका हिसकण्यासाठीं तिनें एकदम हात पुढें केला. चटदिशी झुबका पाठीमागें लपवीत मी म्हणालों,

" चिंचा खाल्ल्यानें दात आंबतात. माझे दात इतके आंबले आहेत कीं, विचारतां सोय नाहीं."

" आंबूदे माझे दात. चालेल मला."

आसपास चिटपाखरूंहि नव्हतें. मी असा उघडाबंब चिंचा खात होतों. सू केविलवाणें तोंड करून चिंचांकडे पहात होती. माझ्या अवखळपणानें भलतीच उचल खाल्ली. मी म्हणालों,

" हे पहा सू, चिंचा खाल्ल्यावर दात आंबतात ना, त्यावर एक औषध आहे. तुला माहीत आहे का !

" अं हं !"

" दात खूप आंबले म्हणजे त्यांनीं— "

वाक्य मधेंच सोडून मी पुढें सरकलों. डाव्या हातानें सूच्या कंबरेला विळखा घालून मी तिला जवळ ओढली आणि उजव्या हातानें तिची हनुवटी वर उचलून तिच्या डाव्या गालाला करकचून चावलों.

ते वाक्य पुरें करायचें होतें मला, पण इतकें हें झाल्यावर माझ्या तोंडचें पाणी पळालें. चिंचेचा झुबका तिथेंच टाकून देऊन मी माझे कपडे उचलले आणि धावत सुटलों. अंधार पडूं लागला होता. अवतीं भवतीं कोणी नव्हतें. शेताच्या कोपऱ्यांत एका बाजूला जाऊन मी धोतर नेसलें; सदरा घातला; आणि सरळ घरच्या रस्त्याला लागलों. मध्यंतरीं वाटेंत सूची वाट पहात थांबलों. घर जवळ आलेलें होतें. सू लांबून येतांना दिसल्या वर मी घराकडे वळलों. घराच्या ओट्यावर मी स्वस्थ बसलों. सू आल्या-

र माझ्याकडे नजरहि न टाकतां ती घरांत शिरली. जेवीत असतांना तेच्या तोंडाकडे पहाण्याचा मला धीर झाला नाहीं.

पुण्याची गाडी रात्रीं बाराला निघत असे. पांच सहा मैलांचें अंतर बैलगाडीनें तोडायचें. शक्य तितक्या लौकर निघणें बरें. स्टेशनवरच्या एका माणसाला बाबांनीं गाडीभर कडबा द्यायचें कबूल केलें होतें. कडबा गाडींत भरून तयार होता व त्याच गाडींत बसून आम्हीं स्टेशनवर जायचें, असें ठरलें होतें. बाबांनीं गाडी जोडायला सांगितलें. गाडी दारासमोर येऊन उभी राहिली. गाडीच्यावर अर्धा पुरुष कडबा भरलेला होता. त्यावर दोन घोंगड्या टाकून आमचे होल्डऑल पसरण्यांत आले. निघायची वेळ झाली. मी बाबांच्या व आईच्या पायां पडून त्यांचा निरोप घेतला. सूहि त्यांच्या पायां पडली आणि, ‘ येते ’ म्हणून तिनें निरोप घेतला. हात देऊन बाबांनीं सूला गाडीवर चढविलें. गाडी निघाली. बाबा माझ्या-बरोबर पायीं चालत वेशीपर्यंत आले. बाबा परत गेले तरी बराच वेळ मी पायींच चालत होतों. भिकाजी मला वर बसण्यासाठीं सांगत होता. मी तिकडे लक्षच दिलें नाहीं. सू होल्डऑलवर कलंडली होती.

टिपूर चांदणें पडलें होतें. गार वारा वाहात होता. रस्त्याच्या दोन्ही बाजूंनीं हारीनें लागलेल्या झाडांचीं पानें सळसळ वाजत होतीं. बैलांच्या गळ्यांतील घुंगुरमाळा कर्णमधुर आवाज करीत होत्या. रस्त्याच्या कडेनें असलेल्या शेतांतल्या झापावरचीं कुत्रीं मधून मधून भुंकत होतीं. भिकाजी हळूं हळूं पेंगू लागला होता. वर चढून सूजवळ बसण्यासाठीं माझा जीव अधीर झाला होता. पण कोणत्या तोंडानें वर जाऊन बसूं? आज मीं काय केलें! पश्चात्तापानें माझें डोकें भिरभीर करीत होतें. चार वर्षांच्या तपश्चर्येवर माझ्या हातून एका दिवसांत पाणी पडलें. एवढ्या कडक शिस्तीची सू आणि मी सकाळपासून एखाद्या अस्सल खेडवळाप्रमाणें सर्व गोष्टी केल्या. आणि तो विहिरीवरला प्रसंग! माझ्या अंगावर सर्रकन् कांटा

आला. सूनें जर मला वाळींत टाकलें तर कोणत्या तोंडानें मी तात्यांच्या घरीं राहूं ? पुण्याला जाऊन काळें तोंड घेऊन परत येण्यापेक्षां आतांच घरीं परतलेलें काय वाईट ! बाबा काय म्हणतील ? छे, छे सगळाच गाढवपणा झाला.

सर्वत्र शांत होतें. मी गाडीच्या बाजूनें चालत होतों. झाडांच्या पानांप्रमाणें माझ्या डोक्यांत विचार सळसळ करीत होते. इतक्यांत तिसरा मैल आला. मी थांबलों व मैलाच्या दगडाला टेकून डोकें गच्च हातांत धरून बसलों. गाडी पुढें पुढें चालली होती. गाडी बरीच पुढें गेली. भिकाजी चांगलाच पेंगला होता. सूलाहि झोप लागलेली दिसत होती. पलिकडच्या वळणापुढें गाडी गेली म्हणजे आपण परत पावलीं टाकळीकडे फिरावें हें उत्तम. हो, उगीच शोभा कशाला !

चांदण्याच्या शुभ्र प्रकाशांत गाडीवर झोपलेली सूची आकृति मला दिसत होती. तिच्याकडे पहात मी स्वस्थ बसून राहिलों. वळणाजवळ गाडी गेली. आतां गाडी वळेल व सू माझ्या दृष्टीच्या पलीकडे जाईल. पुन्हां माझी सू मला दिसणार नाहीं. कोंबड्याला मोती सांपडला होता असेंच म्हणावें लागेल. इतक्यांत ती उठून बसल्याचें मला दिसलें. गाडी थांबली. सू भिकाजीला कांहीं तरी म्हणाली वाटतं ! असाच टाकळीकडे पळत सुटूं कां ? इतक्यांत भिकाजीनें उंच आवाजांत हाक मारली.

"नानासाहेब वो नानासाहेब !"

मी ओ दिली व गाडीकडे चाललों. सू वर बसून राहिली होती. डोळे चोळीत चोळीत भिकाजी म्हणाला,

"का वो मालक, मागं कां राह्यला ? पायीं कशापायीं चालतां ? ध्या कीं बसून."

कांहीं न बोलतां मी वर चढून बसलों. गाडी चालूं झाली. सू चंद्र-बिंबाकडे पहात होती. तिच्या डोळ्यांवर झोपेचें लवलेशहि चिन्ह नव्हतें. दुसऱ्या बाजूला तोंड करून मी बसून राहिलों. भिकाजीला पुन्हां झोप

लागली. आतां ज्वालामुखी पर्वताचा उद्रेक होईल म्हणून मी वाट पहात होतों. पण आतां गचांडी मिळेल अशी अपेक्षा करणाऱ्या भिकाऱ्याच्या पदरांत पंचपक्वान्नांचा घास पडावा, तसें झालें. एकवार कुडकुडल्यासारखें करून सू मंजूळ आवाजांत म्हणाली,

"नाना, थंडी वाजते आहे रे फार."

माझा माझ्या कानांवर विश्वास बसेना. लगबगीनें मी माझ्या होल्ड-ऑलमधली रजई बाहेर काढूं लागलों. इतक्यांत ती म्हणाली,

"नको, पांघरायला नको कांहीं,"

"मग?"

"कांहीं नाहीं."

चंद्राकडे पहात ती पुन्हां स्तब्ध बसली. सबंध उन्हाळाभर कडक उन्हानें तापलेल्या जमिनीवर पावसाची पहिली सर येऊन जावी, तसें मला झालें. आशापूर्ण करुण नजरेनें मी तिच्याकडे पहात राहिलों. तिच्या गालांवर हसूं खेळत होतें. अर्धवटपणें बाहेर दिसणाऱ्या तिच्या पांढऱ्या शुभ्र दातांवर चंद्राचे किरण पडून ते चमकत होते. वाऱ्याच्या झुळुकेनें तिचे केस कपाळावर खेळत होते. जराशानें ती म्हणाली,

"नाना, मघाच्या त्या चिंचेनें दात फार आंबले आहेत रे!"

वेंधळ्यासारखा मी पुन्हां म्हणालों,

"मग?"

व ती पुन्हां म्हणाली,

"कांहीं नाहीं."

एकंदरींत विशेष कांहीं बिनसलें नाहीं असें वाटून माझ्या छातीवरला भार हलका झाला. मीहि तिच्याप्रमाणें चंद्रबिंबाकडे पाहूं लागलों. एक भला मोठा ढग चंद्राच्या जवळ जवळ सरकत होता. हळूं हळूं सरकत सरकत त्यानें चंद्राचें बिंब झाकून टाकलें. सू माझ्याजवळ सरकून म्हणाली,

" नाना, चिंचा खाल्ल्यावर दात आंबतात, त्यावरचें एक औषध तुला माहित आहे ना ! मघाशीं तूं मला तें सांगणार होतास, पण तसेंच राहिलें. "

खोटें नाहीं सांगत तुम्हाला. मी लाजेनें खालीं मान घालून बसून राहिलों. नानाची अगदीं सू झाली होती; आणि सूचाहि नाना झाला. माझ्या अगदीं जवळ येऊन ती माझ्या गालाला कडकडून चावली.

मग पुढें काय विचारतां !

---

## गोफणगुंडा

## ३

उन्हाळा कडकूं लागला. गव्हाचा हंगाम संपला. घरोघर पोत्यांच्या ठिक्या लागल्या. कणग्यांत टाकोटाक गहू भरून शेतकऱ्यांनीं त्यांचीं तोंडें लिंपून टाकलीं. शेताशेतांतून निचीतीनें नांगरणी सुरू झाली. जमीन दात वासून ऊन खाऊं लागली. चरोली व मनोली या दोन गांवांमधून वाह-णाऱ्या बाणगंगेचें पाणी ढोपरांना लागूं लागलें.

अक्षयतृतीया जवळ आली. वाडवडिलांना सोन्याचा घास देण्याची तयारी घरोघर सुरू झाली. गहूहरभरे पशापशांनीं जात्यांच्या तोंडांत ओघळूं लागले. अक्षयतृतीया म्हणजे मराठ्यांचा तोलामोलाचा सण. चरोली व मनोली या दोन गांवांमध्यें तर या सणाला भारीच महत्त्व होतें.

मनोली हें हिंमतराव मान्यांचें वतनाचें गांव. चरोली गांवाची देशमुखी भवानराव हंडे यांच्याकडे होती. मराठशाहींत वाडवडिलांनीं गाजविलेल्या मर्दुमकीचें फळ माने आणि हंडे हे दोघेहि वंशपरंपरा खात आले होते. पेशवाईच्या काळांत या दोन घराण्यांत बेदिली झाली. माने व हंडे एक-मेकांना पाण्यांत पाहूं लागले. तेव्हांपासून या दोन घराण्यांत जें वैर माजलें तें आजतागायत! पूर्वापार चालत आलेल्या वतनाबरोबर या दोन घरा-ण्यांनीं आपसांतलें वैरहि जिवाभावानें जतन केलें होतें. या वैराची झळ त्यांच्या वतनाच्या गांवांनाहि लागली होती. चरोली व मनोली या दोन्ही गांवांतले गांवकरी परस्परांशीं फटकून वागत असत. चरोलीकर व मनोली-कर यांचे संबंध दूर ठेवण्यासाठींच की काय, या दोन गांवांच्या मधोमध बाणगंगेचा अडसर पडला होता.

हिंमतराव मान्यांना खासेराव नांवाचा एक मुलगा होता. खासेराव दहा वर्षांचा झाल्यावर त्याची आई वारली. खासेरावच्या पाठीवर कांहीं नव्हतेंच. पहिली बायको वारल्यावर हिंमतरावांनीं दुसरा संबंध केला.

साहजीकच खासेरावची घरांत राळ होऊं लागली. हिंमतराव मनोमन उमजले व त्यांनीं खासेरावला रांजणगांवीं, त्याच्या आजोळीं पाठवून दिलें. दुसऱ्या संबंधापासून फळ झालें नाहीं म्हणून त्यांनीं तिसरा संबंध केला. चार पैसे जवळ असले म्हणजे मराठ्यांना जनाना वाढविण्यांत मोठें भूषण वाटतें! वर्षांमागून वर्षें गेलीं; पण हिंमतरावांच्या चारचौकी वाड्यांत पुन्हां पाळणा हलला नाहीं !

खासेरावला आजोळचा लळा लागला होता. तो बारा महिने, तेरा काळ तिकडेच असे. हिंमतरावांनीं त्याच्याकडे पूर्णपणें दुर्लक्ष केलें होतें. या गोष्टीला बारा वर्षें झालीं. खासेराव आतां बांड झाला होता. हिंमतरावांची तब्येत खचत चालली होती. शिवाय घरांतूनहि दुहेरी टुमणें सुरू झालें. अखेरीस रांजणगांवला निरोप धाडून त्यांनीं खासेरावला बोलावून घेतलें.

दुपार उलटली होती. खासेराव बाणगंगेच्या कांठच्या खडकावर पाण्यांत पाय सोडून बसला होता. डोक्यावरचा केशरी पटका त्यानें बाजूला काढून ठेवला होता. पटक्यानें अस्ताव्यस्त झालेले त्याच्या डोक्यावरचे केस वाऱ्यानें उडत होते. त्याचें लांब नाक टोकाला गरुडाच्या चोचीप्रमाणें वाकडें होतें. ओठावरल्या काळ्याभोर मिशा त्याच्या उमद्या चेहऱ्याला शोभून दिसत होत्या. त्याच्या अंगांत गरम कापडाचा कोट होता. पांढरें शुभ्र पातळ धोतर त्याच्या पोटऱ्यांवर पाण्यानें भिजत होतें. पलीकडच्या थडीवर शेवरीच्या झाडाचें घुंगट घेऊन एक हिरवागार पानमळा पसरला होता. आसपासच्या शेतांत काळींभोर ढिखळें अस्ताव्यस्त पडलीं होतीं. तो दिवस बाजाराचा असल्यामुळें शेतकरी लोक बाजाराला गेलेले होते. चोहीकडे सामसूम होती. दोन मैलांवरचीं चरोली व मनोली या गांवांतलीं भेड्यांचीं घरें पटावरल्या सोंगट्यांप्रमाणें दिसत होतीं.

बाणगंगेचें पाणी खडकाळींतून झुळझुळ वाहत होतें. पाणकणसांच्या अडोशाला तीनचार बगळे माशांवर डोळा ठेवून स्तब्ध होते. इतक्यांत

‘डुबूक’ असा आवाज झाला आणि ते बगळे एकदम उडाले. पाण्यावर वर्तुळाकार लाटा उठल्या. खासेराव बाणांप्रमाणें उडणाऱ्या त्या बगळ्यांकडे पाहूं लागला. इतक्यांत सूं सूं करीत दुसरा दगड आला व रपदिशी त्याच्या डोक्यावर बसला.

खासेराव गैरसावध होता आणि मर्मावर जोरानें बसलेला दगड तो! गिर्रदिशी भोवळ येऊन तो मागच्या मागें पडला. समोरच्या पानमळ्यांतून एक मुलगी बाहेर आली. तिनें खासेरावकडे पाहिलें आणि ती नदीच्या पाण्यांतून धावत धावत अलीकडच्या तीरावर आली. खासेरावच्या डोक्याला खोक पडून तिच्यांतून भळभळ रक्त वाहात होतें. त्या मुलीनें आपल्या लुगड्याचा पदर पाण्यांत भिजवून त्यानें तें रक्त पुसून टाकलें व जवळचें एक पाणकणीस तोडून त्याची शेंडी फिस्कारून जखमेवर बसवली. रक्त थांबलें. पण खासेराव शुद्धीवर येण्याचें अजून लक्षण दिसेना. त्या मुलीनें भेदरलेल्या नजरेनें सभोंवार पाहिलें. आसपास अगदीं शुक्र होतें. ती खडकावर बसली व तिनें खासेरावाचें डोकें अलगद आपल्या मांडीवर घेतलें.

त्या मुलीचें वय अदमासें सोळा वर्षांचें असेल. पण वयाच्या मानानें तिचें हाडपेर मोठें होतें. तिचे डोळे काळेभोर व भोकरासारखे टपोरे होते. आपल्या इरकली लुगड्याचा पदर तिनें डोक्यावरून घेतलेला होता. कुरळ्या केसांच्या बटा पदराखालून उनाडपणें तिच्या कपाळावर खेळत होत्या. उन्हातान्हांत हिंडल्यामुळें तिच्या मूळच्या गोऱ्या रंगावर गव्हाच्या रंगाची तांबूस छटा चढली होती. तिच्या चिंचोळ्या हनुवटीवर गोंदवणाचा हिरवा थेंब खुलून दिसत होता. श्रमानें म्हणा किंवा धास्तीनें म्हणा, तिचें ऊर खालींवर होत होतें. खासेरावच्या उमद्या चेहऱ्याकडे ती टक लावून पहात होती.

खासेराव हळूहळू शुद्धीवर येऊं लागला. आपल्या डोक्याखालीं पाणकणसांची रुई भरून मखमली अभ्रा चढवलेली उशी कोणीं ठेवली हें

त्याला कळेना. त्यानें डोळे उघडले व त्या मुलीच्या तोंडाकडे पाहिलें. पुन्हा डोळे मिटून तसेंच पडून राहण्याचा त्याचा विचार होता; पण त्या मुलीनें चट्दिशी त्याचें डोकें बाजूला करून जवळच्या घटक्यावर ठेवलें व आपण उठून उभी राहिली. खासेरावहि हळूहळू उठून बसला. काय बोलावें हें दोघांनाहि सुचेना. जवळच एक लाल रंगाची रेशमी गोफण पडली होती. तिच्याकडे खासेरावचें लक्ष गेलें व सर्व प्रकार त्याच्या ध्यानांत आला. त्या मुलीनें ती गोफण उचलून हातांत घेतली व ती चाचरत म्हणाली,

" तुम्हांला माझ्या गोफणींतला दगड लागला."

खासेरावनें आजूबाजूच्या उजाड शेतांकडे पाहिलें आणि तो हसून म्हणाला, " कशाची राखण करीत होतां ! "

" राखण नाहीं. जरा हात बसवून पहात होतें. "

" तें कशाला बुवा ! " खासेरावनें आश्चर्यानें विचारलें.

" उद्यां अक्षयतृतीया ना ? " त्या मुलीनें उत्तर केलें.

अक्षयतृतीयेचा सण म्हणजे वाडवडिलांची पूजा. या दिवशीं चरोली व मनोली या गावांतले लोक वडिलार्जित वैराला उजळा देत असत. दोन्ही गावांतले गांवकरी बाणगंगेच्या दोन्हीं थडींवर जमून या दिवशीं आपसांत लढाई करीत. खासेराव लहान असतांना त्यानें या लढाया पाहिल्या होत्या. त्या मुलीच्या हातांतल्या गोफणीकडे पहात तो म्हणाला, " हो खरंच ! तुम्ही चरोलीच्या, नाहीं का ! "

" हो. "

" तुमचं नांव कळेल का आम्हांला ? "

" माझं नांव चांदणी. "

" पण या लढाईत बायका कुठं भाग घेतात ! "

" नसतील घेत. म्हणून आम्हांला कोणाची मना थोडीच आहे ! " चांदणी आवेशानें बोलली. नंतर आपल्या चुकीची आठवण होऊन ती

ओशाळली आणि म्हणाली, " तुम्हांला बरंच लागलयू. मी कांहीं मुद्दाम नाहीं दगड हाणला. चुकीनं लागला."

खासेरावनें आपल्या डोक्यावरची जखम हातानें हळूच चाचपली व तो म्हणाला, " जाऊं द्या. त्याचं काय एवढं मोठंसं ! उद्याची लढाई आपण आजच खेळलों."

" वा ! असं कसं ! आमचा दगड पाव्हणे माणसांसाठीं नसतो."

" पण मी पाव्हणा नाहीं. अस्सल मनोलीकर आहे मी."

" खोटं !" खासेरावच्या रुबाबदार कपड्यांकडे पहात चांदणी उद्गारली. " मनोलीचे नाहीं दिसत तुम्ही; आणि यामागं कधीं दिसलाहि नाहीं. तुमचं नांव ! "

" माझं नांव खासेराव माने. मी बारा वर्षे..."

पण वाक्य पुरें करायला खासेरावला अवसरच मिळाला नाहीं. ककरापासून सुटलेल्या बाणाप्रमाणें चांदणी बाणगंगेच्या उथळ पाण्यांतून धावत सुटली व पलिकडच्या तीरावर जाऊन पानमळ्यांत दिसेनाशी झाली. तिच्या गोऱ्यापान सोटार पिंढऱ्या आणि घोट्यावरले चांदीचे तोडे खासेरावला जरा दिसले आणि मग न दिसले !

खासेराव किती वेळ तरी तसाच समोर पहात बसून राहिला. समोरच्या क्षितिजावर एक मिस्किल चांदणी चमचम करूं लागली, तेव्हां कुठें तो भानावर आला. डोक्यावर कसा तरी फेटा गुंडाळून तो गांवाकडे परत फिरला.

अक्षयतृतीयेची दुपार. बाणगंगेच्या दोन्ही थडींवर ढोलकीं वाजूं लागलीं. दोन्ही गावांतले गावकरी थडीवर जमले होते. दरसालप्रमाणें आसपासच्या खेड्यांतील लोक लढाई पहावयास लोटत होते. गोफणीच्या टप्प्यांत न गवसूं अशा बेतानें हे लोक लांब उभे राहिले. कोणी झाडाची सावली जवळ केली; कोणी फांद्यांवर चढून बसले. ऊन तापत होतें. वाळू तर पाय टाकतांच 'हासहूस' करायला लावीत होती. नदीच्या दोन्ही

बाजूंना वाळूंत दगडांचे ढीग ठायींठायीं रचलेले दिसत होते. मनोलीचे हिंमतराव माने व त्यांचा छोकरा खासेराव हे दोन घोडयांवर बसून आले. त्यांच्यासाठीं एका उंच डगरीवर जाजम टाकून ठेवलें होतें.

हिंमतरावांनीं चुण्याचुण्यांचा मांडचोळणा चढवला होता व पायांत पंजाबी चढाव घातले होते. अंगातल्या पांढऱ्याशुभ्र लांब अंगरख्याच्या आंतून त्यांनीं हिरव्या रंगाचें किनखापाचें जाकीट घातलें होतें. त्यांच्या डोक्यावर पिळाची पगडी शोभत होती. त्यांच्या भरदार चेहऱ्यावर गाल-मिशा व कल्ले एकमेकांत मिसळले होते. ते घोडयावरून उतरले व काखेंत शाल व तरवार धरून आपल्या जागेवर जाऊन बसले. खासेराव त्यांच्या-जवळ जाऊन बसला. त्यानें सुरवार व शेरवाणी अंगांत चढवली होती. त्याच्या डोक्यावर केशरी रंगाचा भरजरी लफ्फेबाज पटका ऐटींत बांध-लेला होता. आदल्या दिवसाची निशाणी त्यानें आपल्या पटक्याखालीं झाकून टाकली होती. बापलेक आपल्या जागेवर जाऊन बसतांच त्यांनीं समोरच्या थडीवर नजर टाकली.

समोरची थडीहि माणसांनीं फुलून गेली होती. चरोलीची तरणीं पोरें गोफणी हातांत धरून डगरीखालीं उभीं होतीं. लहान मुलें व म्हातारेकोतारे मागच्या बाजूला जागा सापडेल तेथें उभे राहिले होते. भवानराव हडे आपल्या घोड्यावरून खालीं उतरत होते. त्यांच्याबरोबर त्यांची एकुलती एक मुलगी चांदणी आपल्या तलख घोडीवर बसून आली होती. भवानराव चांगलेच उंचेपुरे होते. पण वय जास्त झाल्यामुळें त्यांच्या पाटीला थोडेसें पोक आलें होतें. त्यांचे कल्ले आणि गालमिशा पिकून पांढऱ्या शुभ्र झाल्या होत्या. भवानरावांचा पोशाख हिंमतरावांसारखाच होता. मात्र तलम अंगरख्याखालून त्यांनीं तांबडेंलाल जाकीट घातलें होतें.

चांदणी लाल रंगाचा भरजरी बुट्टयांचा बनारसी शालू नेसली होती. लाल रंगाच्या चोळीवर तिनें जरीचें लाल जाकीट घातलें होतें. तिच्या पायांत तांबडया मखमलीचे चढाव होते. काचेचीं काकणें काढून टाकून

तिनें हातांत सोन्याचे तोडे चढवले होते. तिच्या कपाळावर लालजरद कुंकवाची चंद्रकोर रेखलेली होती. आपली आवडती लाल रंगाची रेशमी गोफण तिनें डाव्या मनगटावर गुंडाळून ठेवली होती. अक्षयतृतीयेच्या गोफणगुंड्याची रणदेवताच दिसत होती ती !

बाप व लेक दोघेंहि डगरीवरल्या एका झाडाखालीं जाऊन बसलीं. एका नोकरानें भवानरावांपुढें हुक्का आणून ठेवला. म्हाताऱ्यानें हुक्क्याची नळी तोंडांत धरली व समोरच्या थडीवर नजर टाकली.

चांदणीला घोडीवरून खालीं उतरतांना पहातांच खासेराव चपापला. ही भवानरावांची पोर तर ! काल हिनें आपल्याला पत्ताहि लागूं दिला नाहीं ! तरीच मान्यांचं नांव ऐकतांच वाऱ्याला उभी राहिली नाहीं. चांदणीची मर्दानी ऐट व मोहक हालचाल तो पहातच राहिला.

हिंमतराव गरजले, “ खाशा, काय पहातोस रे ? ”

“ कांहीं नाहीं, बाबा.” खासेराव भानावर आला.

“ भारी सुरेख पोर आहे, नाहीं ? पण फार बाजिंदी ! गुदस्ता सालपासून ती खुद्द लढाईत उतरते. ऐशी गोफणगुंडा खेळते कीं यंव ! बाप्यांना ऐकत नाहीं. मर्दाची लेक आहे ती ! ”

“ होय का ? अरे वा ! ” जखमेच्या जागीं आपला पटका चाचपीत खासेराव उद्गारला.

दोन्ही गांवांतले शंभर शंभर जवान पुढें सरकले व दगडांच्या ढिगाऱ्यांच्या अवधानानें जागा व दबा धरून उभे राहिले. वाळूंत पाय भाजूं नयेत म्हणून त्यांनीं पायतणें घातलीं होतीं; डोक्यांना चारी बाजूंनीं मुंडाशीं गच्च आवळून बांधलीं होतीं; धोतराचे काचे गुडघ्यापावेतों कसलेले होते; आणि पैरणी धोतराच्या आंत खोचलेल्या होत्या. सुंभांच्या दणकट गोफणी त्यांच्या हातांत सापाप्रमाणें लोंबत होत्या. गुरवानें कण्र्याला तोंड लावलें. कण्र्याचा आवाज होतांच लढाईला तोंड लागलें.

गोफणी हवेंत भिरभिरूं लागल्या. दगड सूं सूं करीत सुटूं लागले.

गोफणगुंड्याच्या लढाईत कसलेले लोक ते ! नेम धरून मारलेले दगड कोणाच्या टाळक्यावर तर कोणाच्या छाताडावर आपटूं लागले. दम ताजा असल्यामुळें कोणीहि 'हासहूस' करीत नव्हते. दिवाणखान्यांत सोंगट्यांचा खेळ चालतो ना, तशी ही लढाई शिस्तवारपणें चालली होती. मांगांच्या हातांतलीं टिपरें ढोलक्यांवर आपटून घुमघुम् करीत होतीं. बाणगंगेचें पाणी खिदळत खिदळत वाहत होतें. गोफणींतला गुंडा क्वचितच् पाण्यांत टपकत होता.

असें सुमारें दोन घंटे लोटले. उन्हें तिरपीं झालीं. लढाईला रंग चढूं लागला. दगडांचे हबके ज़सजसे जास्त बसूं लागले तसतशी लोकांना इरीशिरी चढली. ढोलकीं जोरजोरानें वाजूं लागलीं. नेम खाणारे व नेम देणारे यांची हाकाटी आणि ओरड यांनीं बाणगंगेच्या थडी दुमदुमूं लागल्या. जास्त जायबंदी झालेले लोक भोवळ येऊन खालीं पडूं लागले. म्हातारे म्हणून मागें बसलेल्या लोकांना चेव चढूं लागला व कंबरेच्या गोफणी सोडून तेहि लढाईच्या आखाड्यांत उतरूं लागले.

चांदणी आपल्या जागेवरून उठली व हातांतली गोफण फिरवीत पुढें सरकली. खासेराव नजर रोखून सारखा चांदणीकडे पहात होता. हिंमतरावांनीं त्याच्या पाठीवर हात ठेवला व घोगऱ्या आवाजांत विचारलें, "खाशा, रांजणगांवला मेहनत करीत होतास का रे ?"

"होय बाबा."

"रोज दूध किती पीत होतास ?"

"दीड शेर. कां हो बाबा ?"

"कांहीं नाहीं. आपलं उगीच पुसलं."

खासेराव काय उमजायचें तें उमजला व उठून उभा राहिला. त्यानें एक गोफण उचलली व तो पुढें सरकला. हिंमतरावांच्या तोंडावर अवसान फुललें. ते खासेरावला म्हणाले, "खाशा, नेमबाजी दाखव हां गड्या !"

कांहीं न बोलतां खासेरावनें एक कैरीएवढा दगड उचलला, तो

गोफणींत भरला आणि ती हवेंत उचलली. त्याची गोफण इतक्या जोरानें फिरूं लागली, कीं जणूं काय दोरखंडाची छत्रीच त्यानें आपल्या डोक्यावर धरली होती. नेम धरून त्यानें गोफणीचा पदर सोडला. दगड वाऱ्याला कापीत बाणगंगेच्या पात्रावरून उडाला आणि नेमका भवानरावांच्या पुढयांतल्या हुक्क्यावर जाऊन आदळला. हुक्क्यांतले निखारे भवानरावांच्या अंगावर सांडले. म्हातारा ताड्दिशी उभा राहिला आणि खासेरावकडे पाहून हातवारे करूं लागला. हिंमतराव आनंदानें बेहोष होऊन ओरडले, "शाब्बास रे मेरे पठ्ठे !"

खासेरावनें दुसरा दगड गोफणींत भरला. दगड गुईगुई करीत जो निघाला तो भवानरावांच्या पगडीला लागला. म्हाताऱ्याची पिळाची पगडी खालीं पडली. भवानराव रागानें नाचूं लागले. हिंमतराव खासेरावजवळ गेले व त्यांनीं त्याला प्रेमानें मिठी मारली.

हा प्रकार चांदणीच्या नजरेंतून सुटला नाहीं. ती मागें सरकली व बापाजवळ गेली. पगडीला लागलेली माती झटकून तिनें ती त्यांच्या डोक्यावर ठेवली आणि त्यांना शांत करून खालीं बसविलें. थोडासा दम खाऊन ती पुढें आली व तिनें आपली गोफण डोक्यावर गिरकावली. चांदणीचे धोंडे माऱ्यांच्या रोखानें थडकूं लागले. ती दातओठ खाऊन, ताकदीची शिकस्त करून आपली गोफण हसडीत होती. तिचे धोंडे मनोलीच्या जवानांच्या उरापोटांवर आदळूं लागले. एक धोंडा गिरर्र्र् करीत हिंमतरावांच्या पायाजवळ येऊन पडला. पण चेवून हात हिसकल्या-मुळें तिच्या दंडाला कळ आली. उजवा दंड चोळीत ती स्तब्ध उभी राहिली. मावळत्या सूर्याचे सोनेरी किरण तिच्या हातांतल्या सोन्याच्या तोड्यांना कुरवाळीत होते. खासेराव अधाशासारखा तिच्याकडे पहात होता. जराशानें हिंमत करून तो हिंमतरावांना म्हणाला,

"बाबा, काय बाजिंदी पोर आहे हो !"

"तर तर !" हिंमतराव कौतुकानें उद्गारले.

सूर्य मावळला. गोफणी हसडून हसडून लोकांचे हात दुखून गेले होते. गोफणधोंड्याचें अवसान कमी झालें होतें. ढोलक्यांचा आवाज पुचका होऊं लागला होता. दोन्ही बाजूंच्या लोकांनीं गोफणी फेकून दिल्या व लाठ्या हातांत घेतल्या. पायतणें वाळूंत फेकून देऊन ते बाणगंगेच्या पाण्यांत शिरले. लाठ्या हवेंत फिरूं लागल्या. पाण्यांत लाठ्यांची लढाई सुरू झाली. नदीचा निम्मा भाग चरोलीचा आणि निम्मा भाग मनोलीचा. चरोलीकरांनीं मनोलीकरांच्या पाण्यांत यायचें नाहीं आणि मनोलीकरांनीं चरोलीकरांच्या पाण्यांत जायचें नाहीं, असा दंडक होता. नजर नजरेला लागली. काठी काठीला भिडली. हातघाईची लढाई सुरू झाली. काठ्यांचे घाव अंगावर बसूं लागले. दोन्ही बाजूचे लोक पाण्यांत धडाधड आपटूं लागले. पण त्यांच्या लढाईला खंड पडला नाहीं. पाण्यांत पाय पडतांच त्यांच्या अंगांत दुहेरी चेव चढला होता. त्यांच्या अंगावरून रक्ताचे ओघळ वाहून पाण्यांत ठिबकूं लागले. बाणगंगेचें पाणी तांबडें लाल झालें.

ढोलकीं वाजवून मांगांचे हात थकून गेले. अंधार दाटूं लागला. गुरवानें कण्याला तोंड लावलें. लढाई संपली. डगरीवर भराभरा मशाली पेटल्या. मशालींच्या प्रकाशांत चरोलीमनोलीचे लोक घरोघर गेले.

खासेरावच्या डोक्यावरची जखम बरी झाली. पण त्याच्या हृदयाला झालेल्या जखमेची काय वाट ! मनोलीच्या लोकांवर त्वेषानें गोफण झाडणाऱ्या चांदणीची मूर्ति दिवसाचे चारी प्रहर त्याच्या डोळ्यांपुढें दिसे. रात्रीं उशीवर डोकें टेकलें कीं, त्याला अक्षयतृतियेच्या आदल्या दिवसाचा प्रसंग आठवे. झोपेमध्यें तो किती तरी वेळां डोक्याखालची उशी हलक्या हातानें थापटीत बसे. मग त्याला काय वाटत असेल कुणास ठाऊक !

चौकशी करतां तो पानमळा भवानरावांच्या मालकीचा आहे हें त्याला समजलें होतें. संध्याकाळच्या वेळीं तो अनेक वेळां त्या पानमळ्याच्या बाजूला फिरायला जात असे. त्या खडकावर जाऊन बसावें, पाण्यांत खडे टाकावे, उगीचच पाणकणसें तोडावीं, बगळ्यांची मौज पहावी व तोंडानें

ग़ीळ घालावी असा त्याचा क्रम कित्येक दिवस चालला होता. हें सर्व करीत असतांना त्याचें लयलक्ष पानमळ्याकडे असे. पण पानमळ्यांच्या हेरव्या गर्दीत चांदणीचा पदर कधीं फडकला नाहीं. त्याला चांदणी पुन्हां दिसली नाहीं.

मृगाचे शिपकारे सुरू झाले. शेतकऱ्यांनीं पेरणीला सुरवात केली. दोनचार पाऊस खाल्ल्यावर जमिनीनें कात टाकली. चोहीकडे हिरवेंगार देसूं लागलें. बाणगंगेनें बाळसें धरलें. तिचा फिकटपणा जाऊन ती लाल-उर दिसूं लागली. पावसामुळें खासेरावच्या फिरण्यांत खंड पडूं लागला.

बऱ्याच दिवसांनीं उघाड पडली. आकाश ठिगळें लावलेल्या निळ्या गोधडीप्रमाणें दिसत होतें. खासेराव लौकरच बाहेर पडला व पानमळ्या-समोरच्या ऐलथडीवर जाऊन बसला. नदीच्या काठचे खडक व पाण-कणसांचें बेट पाण्याखालीं बुडूं लागलें होतें. बाजाराचा दिवस असल्या-मुळें आसपासच्या शेतांतून सामसूम होती.

थोडया वेळानें खासेरावला पैलथडीवरून गाण्याचा व हसण्याचा आवाज ऐकूं आला. त्यानें कान टवकारले. पुन्हा गाण्याची ललकारी व हसण्याची खुदखुद. तो आवाज पोतीमागच्या गळ्यांतला आहे हें त्यानें ओळखलें. बरेच दिवस वायफट चकरा मारल्यामुळें चांदणीचा चेहरा म्हाण्यासाठीं तो फार उतावळा झाला होता. मनाचा हिय्या करून त्यानें वढाव काढून ठेवले व तो नदींत शिरला. नदीच्या पाण्यानें मांड्यांपर्यंत चढून त्याचें धोतर भिजविलें. पण तिकडे लक्ष न देतां तो आवाजाच्या अनुरोधानें पुढें सरकला.

पानमळ्यांत चांदणी व तिची मैत्रीण सखू या दोघी गप्पागोष्टी करीत बसल्या होत्या. सखू ही चांदणीची जिवाभावाची मैत्रीण होती. सखू चांदणीला वडील होती; तिचें लग्न झालेलें होतें. सखूचा आवाज गोड होता. मधून मधून ती गाण्याचें अकड कडवें घोळून म्हणत होती. चांदणी रागानें भिवया वुमडून म्हणाली,

"हें बघ सखू, मला किनई तें गाणं मुळींच आवडत नाहीं. पुन्हां म्हणशील तर...तर तुला माझी शप्पत आहे."

"शप्पत फिटली अन् साखर वाटली." सखू हसत हसत म्हणाली, "मी म्हणणारच तें गाणं."

सखू गाण म्हणूं लागली. आपल्याला न आवडणारें तें गाणें चांदणी लक्ष देऊन ऐकूं लागली—

नदिपल्याड गऽ झुले कुणाचा पटका ?
लावितो जिवाला चटका
नदिपल्याड गऽ कोण घालतो शीळ ?
देतसे मिशीला पीळ
नदिपल्याड गऽ जपून गोफण झोक
डोक्यावर पाडिल खोक
नदिपल्याड गऽ जिव्हार बसला टोला
जा मांडीवर घे त्याला
नदिपल्याड गऽ कोण मारितो चकरा ?
किंति करशिल बाई नखरा ?
नदिपल्याड गऽ वीर गडी ये खासा
जिव होई तोळामासा
नदिपल्याड गऽ बसला राघू गहिना
ही मळ्यांत लपली मैना
नदिपल्याड गऽ पान नागवेलीचें
तें पान या सुपारीचें !

गाण्याच्या ओळीगणीक चांदणीच्या गालांवर रंग चढत होता. तिच्या हृदयाला रेशमी गुदगुल्या होत होत्या. गाणें संपलें, तेव्हां तिचे गाल गाजरासारखे लाल झाले होते. हलक्या पावलांनीं तेथें आलेल्या व चोरून गाणें ऐकणाऱ्या खासेरावकडे दोघींचेंहि लक्ष गेलें नाहीं. गाणें संपल्यावर

सखूनें वर पाहिलें आणि ती दचकली. चांदणी आपल्याच साखर-विचारांत गुंग होती. सखूनें तिच्या खांद्यावर हात ठेवला आणि डोळ्यानें खूण केली. चांदणीनें खासेरावकडे पाहिलें व ती उद्‌गारली,

" अगबाई !... काय...काय पाहिजे तुम्हांला ? "

खासेराव कांहींच बोलला नाहीं. सखूनें दोघांकडे पाहिलें व ती तिथून उठून जाऊं लागली. चांदणीनें तिला हटकलें, " सखू ! "

पण सखू थांबली नाहीं.

" बघ पल्याड गऽ झुले केशरी पटका
घ्या गोफण अपुली, झटका "

ही ओळ म्हणत म्हणत सखू शेवरीच्या झाडांमागें दिसेनाशी झाली. चांदणीनें खासेरावला विचारलें, " कां हो ? आमच्या मळ्यांत कां आला ? "

" गाणं ऐकायला. " खासेराव उत्तरला.

" पण...पण तुम्हाला काय पाहिजे ? "

" तुम्ही. " खासेराव शांतपणें म्हणाला.

" म्हणजे ? म्हणजे काय ? वाटेल तें बोलायला शरम नाहीं वाटत ? " चांदणी फणकाऱ्यानें बोलली.

" शरम दिली बाणगंगेच्या पाण्यांत सोडून. "

" अस्सं काय ! बरं, आता बऱ्या बोलानं इथून जातां कीं, पुन्हां दगड खायचाय् ? "

" काढा ना तुमची गोफण. दगड खायला आमची तयारी आहे." खासेराव हसून म्हणाला. चांदणीनें एकवार सभोंवार पाहिलें व ती हलु-वारपणें म्हणाली, " हें बघा, तुम्ही जा ना इथून."

" नाहीं जात. " चांदणीच्या चेहऱ्यावरला रंगपंचमीचा खेळ पहात खासेराव खट्याळपणें म्हणाला.

" असं काय करतां ? कोणी अवचित येऊन पाहिलं तर काय म्हणतील ! मला बाई भीति वाटते. जा ना. "

कांहीं न बोलतां खासेरावनें मागें पाय घेतला. नदी उतरून तो पैलथडीवर गेला आणि तोंडानें शीळ घालीत आणि लांब लांब ढांगा टाकीत गांवाकडे परत फिरला.

दुसऱ्या दिवसाची सकाळ: हिंमतराव वाड्याच्या पुढल्या चौकांतल्या कचेरींत बसले होते. खासेराव कचेरींत गेला आणि त्यांच्यासमोर एका खांबाला टेकून उभा राहिला. हिंमतरावांनीं त्याच्याकडे पाहिलें. खासेरावचा चेहरा गंभीर होता. कांहीं न बोलतां तो गप्प उभा राहिला. हिंमतरावांनीं विचारलें, " कां रे ! पैसे बैसे पाहिजेत कां ? "

" अं हं. "

" मग असा गप्प कां उभा राहिलास ? "

खासेरावनें मनाचा हिय्या करून हिंमतरावांना मनांतली गोष्ट सांगून टाकली. हिंमतराव गंभीरपणें ऐकत होते. थोड्या वेळानें ते म्हणाले, " खाशा, हें भलतंच काय डोक्यांत घेतलंस तूं ! सात पिढ्यांत हंड्यांचा आणि आपला सोयरसंबंध नाहीं. त्यांचा आणि आपला हा असा उभा दावा ! हें जमायचं कसं ! छे, ! शक्य नाहीं ! "

एकुलत्या एक पोराचें हें कोड पुरवायला हिंमतराव कचरूं लागले. कुळाचा प्रश्न नव्हता. हंडे शहाण्णव कुळांतले घरंदाज मराठे होते. चांदणीहि त्यांना मनापासून आवडत होती. पण हा संबंध जुळणार कसा ! त्यांना मोठी पंचाईत पडली. आपण होऊन मागणी घालण्याखेरीज दुसरा मार्ग नव्हता. आणि पोराच्या बापानें मागणी घालण्याचा कमीपणा पत्करण्यास ते तयार नव्हते. शिवाय खासेरावचें लगीन म्हणजे नगद पांच हजार रुपये हुंड्याची आवक, असा हिशेब त्यांनीं बांधून ठेवला होता. आपण होऊन मागणी घालायची म्हणजे आपल्या हातानें रकमेवर पाणी सोडायचें ! या रकमेनें त्यांच्या धनदौलतींत विशेष भर पडणार होती

असें नव्हे; पण हुंडयाच्या आकडयानें त्यांच्या मोठेपणाचें पारडें खालीं जाणार होतें. मान ! मान ! ! मराठयांची भंगड जात मानासाठीं घरा-दारांवर निखारे ठेवायलासुद्धां मागें पुढें पहात नाहीं."आणि पोराचें लगीन म्हणजे मानापानाचा वखत. मग हिंमतराव भलत्या सलत्या गोष्टीला कसे तयार होतील ?

हिंमतरावांनीं खासेरावला परोपरीनें सांगितलें; पण त्यानें आपला हेका सोडला नाहीं. बापलेकांची बाचाबाची आठ दिवस चालली होती. हिंमतरावांनीं शिकस्त केली; पण खासेरावनें चांदणीचा घोशा सोडला नाहीं. अखेरीस हिंमतरावांनीं मूग गिळून घेतले व ते मागणी घालावयास कबूल झाले. त्यांनीं भवानरावांना उद्देशून चांदणीच्या मागणीचा खलिता लिहिला व तो दिवाणजींच्या हातांत दिला.

दुसऱ्या दिवशीं तो खलिता घेऊन दिवाणजींनीं भवानरावांच्या वाडयांत पाऊल टाकलें. भवानराव कचेरींत हुक्का ओढीत बसले होते. दिवाणजींनीं त्यांना मुजरा करून खलिता पुढें केला. हुक्क्याची नळी बाजूला सारून भवानरावांनीं खलिता उघडला व ते वाचूं लागले. वाचीत असतांना त्यांच्या चेहऱ्यावर नाना तऱ्हेचे विकार उमटून गेले. वाचन संपल्यावर ते थोडा वेळ स्तब्ध बसले. नंतर त्यांनीं चांदणीला हाक मारली. चांदणी बाहेर आली. भवानराव तिला म्हणाले,

" हे मान्यांचे दिवाणजी त्यांचा खलिता घेऊन आले आहेत. मान्यांनीं त्यांच्या कारटयासाठीं तुला मागणी घातलीयू. गेल्या लढाईत याच कारट्यानं माझी पगडी उडवली होती. आणि आतां माझा जावई होऊं पहातो ! बापलेक दोघेहि बेशरम ! पण म्हणावं, मी भवानराव हंडे आहे ! माने माझ्यासमोर वाकतील, मी नाहीं त्यांच्यासमोर वाकणार ! "

चांदणी गप्प उभी राहिली. दिवाणजी गोंधळांत पडले. ते चाचरत म्हणाले, " मग खलित्याचं उत्तर... ? "

" देतों, देतों जरीं थांबा. चांदणी, ती खुंटीवरली गोफण दे त्यांना. हेंच त्यांच्या खलित्याचं उत्तर."

" पण बाबा..."

" गप्प बैस तूं. " चांदणीवर खेकसून भवानराव म्हणाले, " तुला सांगितलं तें ऐक. "

यावर चांदणी काय बोलणार ? तिनें खुंटीवरली गोफण काढली. इतक्यांत तिच्या डोक्यांत एक कल्पना आली. ती धावतच आंत गेली व आपली रेशमी गोफण घेऊन बाहेर आली. तिनें ती गोफण दिवाणजींच्या हातांत ठेवली.

" अग ऽ, तुझी गोफण कशाला देतेस ? ती दुसरी दे कीं. " भवानराव ओरडले.

" बाबा, माने जरी आपले वैरी असले तरी कुळानं ते आपल्याच तोलाचे आहेत त्यांना सुंभाची गोफण देणं वाईट दिसेल."

" बरं ! तुला काय वाटेल तें कर."

मान्यांचे दिवाणजी चांदणीची गोफण घेऊन मुकाट्यानें बाहेर पडले. बाणगंगेला पुष्कळच पाणी चढलें होतें. दोन गांवांमध्यें ३६४ दिवस दळणवळण नसल्यामुळें नावेची अगर होडीची सोय नव्हती. लांबच्या रस्त्यानें त्यांना चरोलीला यावें लागलें होतें. आल्या रस्त्यानें ते मनोलीला परत गेले. त्यांनीं ती गोफण हिंमतरावांच्या पुढ्यांत ठेविली आणि झालेला सर्व प्रकार सांगितला. खासेराव तिथें होताच. बापलेक संतापानें धुमसूं लागले. दिवाणजी मुकाट्यानें बाहेर गेले. हिंमतरावांनीं ती गोफण आपल्या हातांत घेतली व ते दातओठ खात म्हणाले,

" पुढल्या लेढाईत याच गोफणीतल्या गुंड्यानं मी त्या इंडयाचे उरले सुरले दात नाहीं पाडले, तर मान्यांची अवलाद नाहीं सांगणार. "

आषाढ सरला. पावसाची रिपरिप चालू होती. बाणगंगा फूं फूं करीत

वाहात होती. तिचें अफाट पाणी चरोलीच्या व मनोलीच्या गांवकुसांना थडकत होतें.

नागपंचमी आली. लोकांनीं फांद्याफांद्यांवर झोके बांधले. गारुड्यांच्या पुंग्या वाजूं लागल्या. झोक्यांबरोबर नागांच्या फडा झुलूं लागल्या. बायकांनीं धरलेले फेर पहाण्यासाठीं ढगांच्या खिडकींतून सूर्याचे किरण बाहेर डोकावूं लागले.

दुपारची वेळ. ओलें ऊन पडलें होतें. बाणगंगेच्या कांठावर चिंचेचीं व वडाचीं मोठमोठीं झाडें होतीं. या झाडांना बांधलेले झोके चरोली–मनोलीच्या पोरांना घेऊन हेलकावे खात होते. उंच उंच फांद्यांवरले लांब-लांब झोके मागें पुढें होतां होतां प्रवाहाला समांतर होऊं लागले. फांद्या करकर वाजूं लागल्या.

चांदणी सखूला घेऊन झोका खेळायला आली. तिनें आपल्या पदराचा पचंग बांधला व ती एका चिंचेच्या झांडावर बांधलेल्या उंच झोक्यावर चढली. सखूनें झोक्याला गति दिली. चांदणीनें झोका वर चढवला.

जसजसा झोका वर चढूं लागला तशतशी चांदणीला मौज वाटूं लागली. खालीं पाहिलें तर मातीनें गढूळ झालेलें बाणगंगेचें पाणी आणि वर पाहिलें तर ढगांनीं गढूळ झालेलें आकाश. तिनें झोका आणखी वर चढवला. फांदीला बांधलेल्या दोन दोरांपैकीं एक घासून घासून कापत चालला होता. सुंभाचा पीळ सुटत, तुटत चालला होता. फांदी उंचावर असल्यामुळें हें कोणाच्याच लक्षांत आलें नाहीं. अखेरीस झोक्याचा वेग सहन न होऊन सुंभानें दम सोडला. गोफणींतून सुटलेल्या दगडाप्रमाणें चांदणी फेकली गेली व फूं फूं करणाऱ्या बाणगंगेच्या पाण्यांत आदळली. झाडाच्या लहानशा ढगळीप्रमाणें ती झपाट्यानें खालीं वाहात जाऊं लागली. लोकांनीं एकच हलकल्लोळ केला! चरोलीच्या लोकांचा गलका मनोलीच्या थडीवर ऐकूं गेला. दोन्ही थडींवरले झोके झटक्यास थांबले. खालीं वाहात जाणाऱ्या चांदणीकडे लोक पाहूं लागले.

चांदणीला चांगलें पोहतां येत होतें. परंतु पाण्याच्या जोरापुढें तिचा टेकाव लागेना. बराच वेळ झोका खेळून तिचा दम अगोदरच उखडला होता. तिनें हात मारण्याचा पुष्कळ प्रयत्न केला; पण प्रवाहाचा जोर अंगावर घेऊन पाणी कापायला तिची ताकद चालेना. खुषींत आलेली बाणगंगा फेसाचे दात दाखवूं लागली.

गांवाच्या खालच्या बाजूला बाणगंगेनें वळण घेतलें होतें. वळणाच्या ठिकाणीं मनोलीच्या थडीवर घाट बांधलेला होता. घाटावर आपटणारें पाणी गिरकी घेऊन दिशा बदलीत होतें. या ठिकाणीं पाण्याचा भोवरा तयार झाला होता. चांदणी असहाय्यपणें भोवऱ्याकडे वाहात चालली होती. लोक घसा खरडून ओरडूं लागले, " भोवरा ! भोवरा ! "

झोका खेळण्यासाठीं म्हणून खासेराव नदीकडे यायला निघाला होता. अर्ध्या वाटेंतच त्याला नदीवरची ओरड ऐकूं आली व तो धावत सुटला. नदीजवळ आल्यावर त्याला कोणीतरी स्त्री वाहात जात असल्याचें दिसलें. कोणीच उडी टाकली नाहीं हें पाहून त्याला चीड आली. त्यानें अंगावरले कपडे काढून फेकून दिले व पाण्यांत उडी घेतली.

चांदणी बरीच दूर वाहात गेली होती. दोघांमध्यें अंतर पुष्कळ होतें. खासेराव प्रवाहाच्या दिशेनें जोरजोरानें हात मारीत होता. बाणगंगेच्या प्रवाहांतून जाणारा बाणच होता तो ! आपला घास बाहेर काढण्याचा प्रयत्न करणाऱ्या खासेरावकडे पाहून बाणगंगा विकटपणें हसत होती.

चांदणीचे हातपाय अगदींच थकून गेले होते. भोवरा जवळ आल्याचें पहातांच तिचा धीर सुटला; तिच्यानें हालचाल होईना. एका क्षणांत ती भोवऱ्यांत सापडली व गरगर फिरून खालीं गेली. लोक तळतळून ओरडले. खासेराव बेदरकारपणें भोवऱ्याच्या दिशेनें पोहत होता. लोक मोठ्यानें ओरडूं लागले, " मागं फीर ! मागं फीर ! "

पण खासेराव मागें फिरला नाहीं. भोवऱ्यांत गडप होणारी स्त्री दुसरी तिसरी कोणी नसून चांदणी आहे. हें त्यानें पाहिलें होतें. काळाशीं झुंज

खेळण्यासाठीं त्याचें रक्त उसळत होतें. भोवरा फोडून बाहेर निघणें अशक्य आहे हें त्याला माहीत होतें; पण भोवऱ्याच्या खालून पोहत जाण्याची कला त्याला येत होती. असल्या अफाट पुरांत तें कितपत जमेल याची शंका होती; पण शंकाकुशंकांचे थंड विचार त्याच्या गरम डोक्याला शिवले नाहीं. भोवऱ्यापासून सुमारें दहा हात अंतरावर त्यानें पाण्यांत बुडी मारली.

एक मिनिट गेलें. पाण्याखालच्या खासेरावप्रमाणेंच लोकांनींहि आपापले श्वास रोखून धरले. आणखी एक मिनिट गेलें. असल्या वेळीं वेळेचें भान राहात नाहीं. लोकांना पांच मिनिटें गेल्यासारखीं वाटलीं. त्यांचा धीर सुटला. दोन्ही थडींवर बायकांची रडारड व पुरुषांची हळहळ सुरू झाली. एकच हलकल्लोळ उडाला !

आणखी अर्धें मिनिट गेलें. भोवऱ्यापासून सुमारें वीस हातांवर खासेराव पाण्याच्या बाहेर आला. त्यानें प्रथम एक मोठा श्वास घेतला व नंतर खवाटयाला धरून चांदणीला आपल्या अंगावर घेतलें. चांदणी बेशुद्ध होती. त्या दोघांना पहातांच लोकांनीं आनंदानें आरडाओरड केली. खासेराव हात मारूं लागला. थोडयाच वेळांत चांदणीला घेऊन तो चरोलीच्या थडीवर पोचला.

थोडया वेळानें चांदणी शुद्धीवर आली. चांदणीनें डोळे उघडल्याबरोबर खासेराव पाण्यांत शिरला व पोहत पोहत मनोलीकडे फिरला. बाणगंगा खजील होऊन वाहूं लागली.

आठ दिवसानंतरची गोष्ट. नदीचें पाणी बरेंच कमी झालें होतें. भवानराव पोशाख करून नदीच्या कांठीं आले. दोन खाटा सुंभानें एकत्र जखडून पाण्यांत सोडण्यांत आल्या. त्यांच्या आठ खुरांना अनेक मोठमोठे भोपळे बांधले होते. खाटांवर भलीं मोठीं जाजमें घडया करून अंथरलीं होतीं. एका खाटेवर भवानराव मांडी घालून बसले. दुसऱ्या खाटेवर सनई व चौघडा घेऊन दोन माणसें बसलीं. चौघडा धुडुम् धुडुम्

वाजूं लागला. सनई मंजूळ सूर काढूं लागली. चरोलीचे पंचवीस जवान पाण्यांत उतरले. एक हात खाटेला लावून दुसऱ्या हातानें ते पाणी कापूं लागले. तराफा बाणगंगेच्या पाण्यांतून सरकत सरकत मनोलीकडे येऊं लागला. ही गंमत पहाण्यासाठीं मनोलीचे लोक गोळा होऊं लागले. तराफा ऐलथडीला लागला. भवानराव खालीं उतरले. उभ्या आयुष्यांत पहिल्या प्रथम त्यांनीं मनोलीच्या थडीवर पाय ठेवला. ते मान्यांच्या वाड्याकडे निघाले.

हिंमतरावांना ही खबर पोचलीच होती. बापलेक वाड्याच्या ओटीवर उभे राहून भवानरावांची वाट पहात होते. भवानराव आले. त्यांनीं रामराम केला. रामराम स्वीकारून हिंमतराव म्हणाले, "या, आंत या."

हिंमतरावांनीं भवानरावांना कचेरींत गादीवर नेऊन बसविलें व आपण त्यांच्याजवळ बसले. एका गड्यानें गुळाचा खडा व पाण्याचा तांब्या भवानरावांच्या पुढ्यांत ठेवला. दुसऱ्या गड्यानें हुक्का शिलगावून त्यांच्या-पुढें ठेवला. भवानरावांनीं गूळ-पाणी घेतलें आणि हुक्क्याच्या नळीला तोंड लावून ते झुरके घेऊं लागले. हुक्क्यांतलें गुलाबपाणी गुड्गुड् वाजूं लागलें. गुलाबपाण्याचा व गुडाखूचा सुगंध कचेरींत पसरला. हिंमतराव म्हणाले, "बोला."

"आमच्या पोरीला पदरांत घ्या म्हणून सांगायला आलों आहे."

"नाहीं जमायचं तें. आमच्या मुलाला रावराजांच्या मुली सांगून आल्या आहेत."

"तें मला कबूल आहे. पण आपल्या मुलानं तिला जीवदान दिलं. आतां आपण तिला चुडेदान करावं अशी विनंति आहे." म्हाताऱ्यानें हात जोडले.

हिंमतरावांच्या चेहऱ्यावर हास्य चमकलें. ते म्हणाले, "ठीक आहे. आपण हुंड्याचे पांच हजार रुपये मोजायला तयार असलां, तर माझी ना नाहीं."

भवानराव मिनिटभर स्तब्ध बसले व त्यांनीं हुक्क्याला तोंड लावलें. निखारा फुलून गेला. निखाऱ्यांची लालट क्षणभर त्यांच्या डोळ्यांत चमकून गेली. नळी बाजूला करून ते म्हणाले, " ठीक आहे."

" ठरलं तर मग ? "

" होय. ठरलं. "

थोड्या वेळानें भवानराव उठले. बापलेक त्यांना पोचवायला नदीपर्यंत गेले. भवानराव खाटेवर बसले. चौघडा झडूं लागला. खाटांचा तराफा आलेली वाट परत चालूं लागला. तो पैलथडीला पोचेपर्यंत हिंमतराव व खासेराव तेथेंच उभे होते.

लग्न ठरल्याचें ऐकून दोन्ही गांवांतल्या लोकांना आनंद झाला. त्यांची दिलजमाई झाली. त्याचे आपसांतले व्यवहार प्रेमळपणानें सुरू झाले. अक्षयतृतियेच्या लढाईला इथून फाटा द्यायचा असें त्यांनीं मनोमन ठरवून टाकलें. लगीनसराईला अजून अवकाश होता. मार्गशीर्षांतली तिथि न धरतां वैशाखांतली धरावी असें ब्राह्मणांचें मत पडलें. अक्षयतृतियेला लग्न ठरलें.

झाडाझाडांवर चैत्रपालवी फुटूं लागली. वसंत ऋतूनें आपली गोफण झटकली. आंब्याच्या झाडांवर कैऱ्यांचे गुंडे लटकूं लागले.

सखूनें चिडवून चिडवून चांदणीला हैराण केलें. लगीन झाल्यावर नांव घेण्यासाठीं म्हणून तिनें चांदणीसाठीं नवीन नवीन उखाणे रचले. पण हे उखाणे सखू चांदणीला ज्या वेळीं आंतल्या चौकांत शिकवीत बसली होती, त्याच वेळीं बाहेरच्या चौकांत चरोलीचे चारपांच शिष्ठ गांवकरी भवानरावांबरोबर कसलेंतरी खलबत करीत बसले होते.

वैशाख शुद्ध द्वितीया. खासेरावला हळद लागली. उष्टी हळद घेऊन मनोलीच्या बायका वाजत गाजत चरोलीला गेल्या. नवऱ्यामुलीला हळद लागली. लग्नासाठीं दुसऱ्या दिवसाचा गोरज मुहूर्त ठरला होता.

अक्षयतृतीया. देवक बसविल्यावर खासेराव शृंगारलेल्या घोड्यावर

बसला. त्यानें मारुतीचें दर्शन घेतलें. ज्या वेळीं लढाई ऐन रंगांत यायची त्या वेळीं लग्नाचें वऱ्हाड बाणगंगेच्या पाण्यांतून जाऊं लागलें. भवानरावांच्या वाड्यापुढें लग्नाचा प्रशस्त मंडप घातलेला होता. वऱ्हाडाचें स्वागत करायला भवानराव जातीनें मंडपाच्या दाराशीं उभे होते. वऱ्हाड मंडपांत लोटलें. नवरामुलगा बोहल्याजवळ जाऊन उभा राहिला. नंगी तलवार हातांत धरून खासेरावचा मामा त्याच्या पाठीशीं उभा राहिला. ब्राह्मणांनीं अंतरपाट धरला. हिरवे चुडे भरलेली, दागिन्यांनीं लहडलेली आणि मोत्यांची मुंडावळ बांधलेली चांदणी करवल्यांच्या घोळक्यांतून पुढें आली व हातांत हार घेऊन अंतरपाटापुढें उभी राहिली.

लग्नमंडप माणसांनीं तुडुंब भरला होता. हिंमतराव ओटीवर टाकलेल्या बैठकीवर लोडाला टेकून बसले होते. शेजारच्या लोडाला टेकून भवानराव बसले होते. हिंमरातरावांचा चेहरा गंभीर होता. ते सारखे चुळबूळ करीत होते. नवरीमुलगी बोहल्यापुढें आल्यावर मात्र त्यांना राहावेना. ते भवानरावांना म्हणाले, " हुंड्याचे रुपये ? "

" हुंडा ! " भवानरावांनीं मिशीला पीळ देत विचारलें, " कसला हुंडा ! "

हिंमतराव ताड्दिशी उभे राहिले आणि गरजले, " अगोदर हुंड्याचे पांच हजार सुरती रुपये मोजा. मग लगीन ! "

भवानराव उठले आणि हिंमतरावांच्या समोर कंबरेवर हात टेवून म्हणाले, " दमडी मिळणार नाहीं दमडी ! "

मंडपांत एकदम शांतता झाली. हिंमतरावांचे डोळे आग ओकूं लागले. त्यांनीं एकवार सभोंवार पाहिलें व ते खासेरावला उद्देशून ओरडले, " खाशा, मागं सरक ! "

खासेराव बोहल्यापुढून मागें सरकला. भवानरावांनीं धावत जाऊन त्याचा रस्ता रोखला व ते म्हणाले, " खबरदार ! "

भवानरावांच्या तोंडून तो शब्द बाहेर पडतांच मांडवांत विजेच्या वेगानें

हालचाली सुरू झाल्या. दोन इसम पुढें होऊन त्यांनीं खासेरावच्या मामाच्या हातांतली तलवार हिसकावून घेतली. पांचपन्नास लोकांच्या हातांत कोठून कोण जाणे, पण भाले व कुऱ्हाडी चमकूं लागल्या. चौघांनीं भाल्यांच्या टोकांनीं खासेरावला बोहल्यापुढें ढकललें. पांचसहा जवानांनीं भाले रोखून हिंमतरावांना गराडा घातला. कांहीं मनोलीकर उठूं लागले. त्यांच्या मानेवर कुऱ्हाडी ठेवून चरोलीचे लोक त्यांच्यामागें उभे राहिले. भवानराव खड्या सुरांत ओरडले, " खबरदार कोणी जागचा हलला तर! कुऱ्हाडीनं तोडून काढूं. तशी वेळ आलीच तर मनोलीचा एकहि माणूस आज बाणगंगेच्या पलीकडे जिवंत जाणार नाहीं!"

त्यांनीं विजयी मुद्रेनें चोहीकडे पाहिलें व ते हिंमतरावांच्या पुढें उभे राहिले. हिंमतराव त्यांच्या अंगावर उडी घेण्यासाठीं चुळबूळ करूं लागले. भाल्यांचीं टोकें त्यांच्या कपड्यांत घुसलीं व त्यांना जाम उभें राहाणें भाग झालें. भवानराव हसून म्हणाले, " हिंमतराव माने, हें बरं नाहीं. आतां आम्ही तुमचे व्याही होणार. आज अक्षयतृतीया आहे म्हटलं."

हिंमतराव गप्प उभे राहिले. भवानराव ब्राह्मणांना उद्देशून म्हणाले, " हं, आटपा!"

मंगलाष्टकें सुरू झालीं. भाल्यांच्या फाळावर खासेरावचें लग्न लागलें. अंधार पडूं लागला. भराभर मशाली पेटल्या. मशालींच्या प्रकाशांत भाल्यांचे फाळ चमचम करूं लागले. लाजाहोमाचा विधि उरकला. कुऱ्हाडीभाल्यांच्या पहाऱ्यांत मनोलीचे लोक मंडपाबाहेर पडले. मंडपाच्या दाराशीं खासेरावचा घोडा उभा होता. खासेराव घोड्यावर बसला. भवानराव चांदणीला म्हणाले, " पोरी, बैस त्याच्यापुढं. आजपासून तूं मान्यांची झालीस."

चांदणी कांहीं न बोलतां घोड्यावर खासेरावच्या पुढें बसली. वाजंत्रीं वाजूं लागलीं. वरात चालूं लागली. भवानराव म्हणाले, " चला, आम्ही तुम्हांला बाणगंगेपावेतों पोचवायला येतों."

हिंमतरावांचा घोडा मंडपाबाहेर एका बाजूला बांधला होता. त्यांनीं एका जागल्याला जवळ बोलावून त्याच्या कानांत कायसें सांगितलें. जागल्या त्या घोड्यावर बसला. त्यानें घोड्याला टाच मारली व तो अंधारांत नाहींसा झाला. हिंमतराव वरातीबरोबर चालूं लागले.

वरात डगरीपर्यंत आली. हिंमतराव ओरडून म्हणाले, " थांबा ! " सर्व लोक जागच्या जागीं थांबले. " बाणगंगेच्या वाळूंत कुऱ्हाडी व भाले यांना मज्जाव आहे ! "

" खरं आहे." भवानरावांनीं मान हलवली आणि ते आपल्या लोकांना म्हणाले, " भाले आणि कुऱ्हाडी इथंच टाका ! "

चरोलीकरांनीं हत्यारें तिथेंच ठेवून दिलीं. वाळूंतून वरात चालूं लागली आणि पाण्यापर्यंत आली. चरोलीकर वाळूंतच उभे राहिले. लग्नाचें वऱ्हाड पाण्यांतून चालूं लागलें. भवानराव हात जोडून हसत हसत म्हणाले, " व्याही, आम्ही आतां माघारीं फिरतों."

" कां ! माघारीं कां जातां ? आज अक्षयतृतीया ना ? असे पाण्यांत या." हिंमतरावांनीं आव्हान दिलें.

एका क्षणांत वरातीचा रंग पालटला. जागल्यानें काठ्यांचें बंडल पुढें आणलें. लोकांनीं भराभर काठ्या उपसून घेतल्या व त्या सरसावून ते उभे राहिले. बाकीच्या लोकांनीं कंबरेच्या गोफणी सोडल्या व वाळूंतले दगड उचलून ते फेकायला सुरवात केली. चरोलीच्या ज्या लोकांजवळ काठ्या होत्या ते पुढें सरकले. कांहीं लोकांनीं पळत जाऊन मागें ठेवलेल्या कुऱ्हाडीचे दांडे काढून आणले. लढाई जुंपली. मशालींच्या प्रकाशांत बाणगंगेच्या पाण्यांत होणारी ही पहिलीच लढाई !

खासेराव घोड्यावरून खालीं उतरला. त्यानें एक काठी हातांत घेतली व तो पुढें सरकला. हिंमतराव त्याला थोपवीत म्हणाले, " खाशा, तुझी हळद फिटायला अजून अवकाश आहे. तुझ्या सुरीवरलं लिंबू तीन दिवस काढायचं नाहीं. नवरामुलगा आहेस बाबा तूं. मागं हो ! "

खासेराव मागें सरकला. हिंमतरावांनी त्याच्या हातांतली काठी घेतली व ते पुढें झाले. त्यांचें आव्हान स्वीकारून भवानराव हातांतली काठी पेलीत पाण्यांतून येत होते. चांदणीनें वाळूंत घोडा उभा केला व ती खालीं उतरली. डोक्यावरलें बाशिंग पाण्यांत फेकून देऊन ती हिंमतरावांकडे धावत आली. त्यांच्या हातांतल्या काठीवर हात ठेवून ती म्हणाली, " मामंजी, तुम्ही मागं व्हा ! मी आजपासून मान्यांची झालें. मनोलीच्या शिवेवर मी आज हक्कानं उभी आहे. ज्यानं आपली जबान मोडली, त्या नामर्दाचा समाचार मी घेतें. मामंजी, काठी सोडा ! "

" पोरी, काय हें ? " काठी तिच्या हातांत देत हिंमतराव उद्‌गारले.

" पोरी, काय हें ? " जवळ आलेले भवानराव उद्‌गारले. " मला नामर्द म्हणतेस ? मला ? तुझ्या बापाला ! "

" होय, तुम्हांला ! खरा मर्द दिलेल्या जबानीला हरताळ फाशीत नाहीं. खरा मर्द बेहत्यार लोकांवर तुटून पडत नाहीं. तुम्हांला बाप म्हणायची शरम वाटते मला. हें घ्या ! "

चांदणीनें लाठीची सलामी दिली व हात फिरवायला सुरवात केली. हिंमतराव मागें सरकले. भवानराव लाठी फिरवूं लागले. लाठीवर लाठी आपटूं लागली. मशालींच्या प्रकाशांत बापाची आणि लेकीची लढाई सुरू झाली. बाकीच्या लोकांनीं हात आखडले व ते या अजब लढाईकडे डोळे टवकारून पाहूं लागले. गोफणींची फिरत थांबली. गोफणवाले हा सामना पहायला पुढें सरकले. चांदणीची काठी भरवेगानें हवेंत भिणभिण करीत होती. भवानरावहि चेवून काठी फिरवीत होते. दोघांच्या काठ्या एकमेकींवर ताडताड आपटत होत्या. क्वचित् निसटते तडाखे अंगावर बसत होते. भवानरावांच्या काठीचा एक तडाखा चांदणीच्या मनगटावर बसणार, इतक्यांत त्यांनीं हात मागच्या मागें घेतला.

" पोरी, तुझे चुडे सांभाळ."

" मघा या चुड्यांच्या घऱ्यावर भाले रोखतांना खंत नाहीं वाटली;

आणि आतां या चुड्यांची कदर ! बाबा, हात मागं नका ओढूं. सामन्यांत वाढवलेला चुडा अहेवपण वाढवतो. हुश्शार ! "

चांदणीनें काठी उगारली व भवानरावांच्या उजव्या खांद्यावर रप्पदिशी मारली. म्हातारा कळवळून ओरडला.

पण लगेच सावरून त्यानें लाठीचे हात करायला सुरवात केली. चांदणीची काठी गुं गुं करीत तिच्याभोंवतीं फिरत होती. जणूं काय पन्नास काठ्यांचा पिंजरा तिच्या अंगाभोंवतीं उभा राहिला होता. भवानरावांची काठी ताडताड आपटून मागें फिरूं लागली. त्यांची ताकद तोकडी पडत होती. उजवा खांदा दुखावल्यामुळें त्यांचा हातहि बहिरल्यासारखा झाला होता. नेम साधून चांदणीनें त्यांच्या उजव्या मनगटावर काठीचा तडाखा लगावला. भवानरावांच्या हातांतील काठी उडून गेली. मनगट चोळीत ते मटकन् पाण्यांत बसले. लढाई थांबली.

चरोलीकरांनीं भवानरावांना मागें घेतलें. चांदणीनें हातांतली काठी टाकून दिली आणि ती खासेरावच्या पुढें घोड्यावर बसली. वाजंत्रीं वाजूं लागलीं. वरात पुढें निघाली. बाणगंगा खुद्‌खुद् हसत वाहात होती. तिची अक्षयतृतीया साजरी झाली.

आठ दिवसांनीं बाणगंगेच्या पात्रांत वाजंत्र्यांचा आवाज पुन्हा घुमूं लागला. वाजंत्र्यांच्या मागून पांच माणसें चाललीं होतीं. त्यांच्या डोक्यां-वर रेशमी रुमालांनीं झाकलेलीं चांदीचीं ताटें होतीं. मागून भवानराव पायीं चालत होते. त्यांचा उजवा हात रुमालानें गळ्याला बांधलेला होता. मान्यांच्या वाड्यापाशीं मिरवणूक थांबली. भवानराव पुढें झाले.

" व्याही, रामराम ! हात वर करीत नाहीं याची दखल नका मानूं हं."

हिंमतरावांनीं रामराम केला व भवानरावांचा डावा हात धरून त्यांनीं त्यांना बैठकीवर नेऊन बसविलें. चांदीचीं ताटें हिंमतरावांच्या पुढ्यांत ठेवण्यांत आलीं. रुमाल बाजूला झाले. ताटांत सुरती रुपयांचे ढीग चमूचम् करीत होते. " पांच हजार मोजून घ्या व्याही. "

हिंमतराव कांहींच बोलले नाहींत. चांदणी बाहेर आली व तिनें हाक मारली, " बाबा ! " धावत येऊन तिनें बापाला मिठी मारली व ती धुमसून रडूं लागली–" बाबा, बाबा ! "

भवानरावांच्या डोळ्यांना तरतरून पाणी आलें. चांदणीच्या पाठीवरून डावा हात फिरवीत ते म्हणाले, " काय म्हणतेस बेटा ? "

" बाबा, मी फार दुष्ट आहें हो ! " चांदणी स्फुंदून स्फुंदून म्हणाली.

" नाहीं बरं बाळ. तूं खरीच शहाणी आहेस. मीच...बरं, जाऊंद्या."

भवानरावांनीं आपले डोळे पुसले व चांदणीचें डोकें हातानें थोपटीत ते हिंमतरावांना म्हणाले, " व्याही, या पोरीचे दिवस आतांपावतर भारी लाडाकोडांत गेले. मी तर आता पिकलं पान झालों आहे. हिला जीव लावा. "

हिंमतरावांचा कंठ भरून आला. त्यांना कांहीं बोलवेना. त्यांनीं नुसती मान हलवली. भवानरावांनीं चांदणीच्या हनुवटीला हात लावला व ते म्हणाले, " पोरी, आता तुझं लगीन झालयू. ही तुझी सासुरवाडी आहे. अशी पुरुषामाणसांत काय येतेस ? जा, गोषांत जा. "

चांदणी हुंदके देत देत आंत गेली. हिंमतराव भवानरावांना म्हणाले, " आज आमच्या घरीं देवकार्य आहे. मटण-भाकरीचं जेवण झाल्यावर रात्रीं गोंधळ आहे. आलांत तसे दोन घास खाऊन जा. "

" नका, मला जेवणाचा आग्रह करूं नका ! जातों मी आतां. रामराम ! "

हिंमतरावांना बोलायला अवसर न देतां भवानराव उठून दरवाजाकडे वळले. पोलादाच्या कांबीसारखा तो कडक म्हातारा वाड्याच्या पायऱ्या उतरला व चरोलीच्या दिशेनें चालूं लागला. त्यांनीं एकदांहि मागें वळून पाहिलें नाहीं.

---

# म्होतूर



वैशाख उजाडला. लगीनसराई सुरू झाली. गावगन्ना ताशेवाजंत्र्या वाजूं लागल्या. पडगांवच्या भानाजीरावनें आपली मुलगी हरणी आड-गांवच्या हरबाला दिली. दोन्हीहि कुळें जबर ! मग काय विचारतां ! गांवोगांवचे लोक लग्नाला लोटले. बैलगाड्यांची रीघ लागली. धूमधडाक्यानें लगीन लागलें. खंडीखंडी गव्हाचा भरडा शिजून निघाला. लाफशीचे डोंगराएवढे ढीग पडले. पंगतीवर पंगती उठल्या. वाढून वाढून गांव-कऱ्यांच्या कमरा खिळखिळ्या झाल्या. पडगांवला हें लगीन चांगलेंच गाजलें.

झालझेंडा झाल्यावर आडगांवचें लग्नाचें वऱ्हाड परत फिरलें. नवरीच्या पाठराखणीला तीन करवल्या निघाल्या. घुंगुरमाळांच्या तालावर बैल मोठ्या हिरीरीनें धावत सुटले. पडगांवची एक फक्कड पोरगी आपण आपल्या गांवीं घेऊन जात आहोंत यांत त्यांना अभिमान वाटला असावा.

गाड्या हरबाच्या वाड्यापुढें येऊन थडकल्या. नवरामुलगा खालीं उतरला. त्याच्या एका हातांत नारळ आणि दुसऱ्या हातांत लिंबू खोचलेली कट्यार होती. त्याच्या मागोमाग हळदीनें पिवळी झालेली नवरीमुलगी उतरली. करवल्यांनीं नवरानवरीच्या वस्त्रांची गांट बांधली. नवरानवरी दारांत येतांच आयाबायांनीं त्यांच्यावरून लिंबलोण उतरलें. हरणीनें हरबाच्या घरांत पाऊल टाकलें. वस्त्रांची गांठ सोडतांना करवल्यांनीं हरणीला नांव घेण्याचा आग्रह केला. लाजून लाजून हरणीच्या गोऱ्यापान गालांवर शेंदरी रंग चढला. मुरकत मुरकत तिनें नांव घेतलें—

**“ आडगांव अल्याड, पडगांव पल्याड,**
**हरबांचे बोल म्हंजे आंब्याचे पाड. ”**

दोनतीन दिवसांनीं हरबानें कडाक्याचा सत्यनारायण केला व साऱ्या गांवाला जेवण दिलें. तेलच्या, गुळवणी व आळण असा खासा बेत होता.

गांवांतले झाडून सारे लोक जेवायला आले. या गडबडींत बजाबा मात्र कुणालाच दिसला नाहीं. बजाबा हें आडगांवांतलें एक बडें धेंड होतें. गांवच्या चावडीजवळ त्याच्या मालकीचा चिरेबंदी वाडा होता. आडमाप दौलतीचा धूर त्याच्या डोळ्यांवर चढला होता. गांवचे पाटील रामराव यांना त्याची थोरली बहीण दिलेली होती. पाटील बजाबाच्या तंत्रानें गांवचा कारभार चालवीत. बजाबा म्हणेल तें आडगांवांत प्रमाण असे.

पोसलेलें पहिलवानी शरीर, झुपकेदार मिशा आणि लालबुंद मोठमोठे डोळे यामुळें बजाबा भव्य आणि भीतिदायक दिसे. पहिल्या बायकोला मूलबाळ न झाल्यामुळें त्यानें दुसरी बायको केली होती. पण तिचीहि कूस उजवली नाहीं. त्यामुळें तिसरें लग्न ठोकण्याचा बजाबाचा विचार होता. पडगांवच्या भानाजीरावच्या मुलीला—हरणीला—त्यानें मागणी घातली होती. परंतु दोन सवतींवर आपली मुलगी खाईंत लोटायला भानाजीराव तयार झाले नाहींत. बजाबाची दुसरी बायको गोजराबाई हरणीची दूरची बहीण लागत होती.

आपल्या मागणीवर भानाजीरावानें बोळा फिरविल्यामुळें बजाबा अपमानानें आंतल्या आंत पिचत होता. त्यांत पुन्हां हरणी आडगांवांतच हरबाच्या पदरीं पडल्यामुळें त्याचें डोकें संतापानें शिणकून गेलें होतें. मग हरबाच्या लग्नाच्या गांवजेवणाला तो येणार तरी कसा ?

हरबाच्या वाड्यांत पाव्हण्यारावळ्यांची धांदल चालू होती. या आठ दिवसांत त्याला हरणीचें तोंडहि नीट पहायला मिळालें नाहीं. पाव्हण्यांची व सग्यासोयऱ्यांची गर्दी हळूहळू ओसरूं लागली. आतां आपल्याला बायकोशीं बोलायला उसंत मिळेल असें हरबाला वाटलें. पण दुसऱ्याच दिवशीं भानाजीराव दोन घोड्यांच्या घमणींतून त्याच्या दारापुढें येऊन थडकले. त्यांना पोरीवांचून करमत नव्हतें. हरणीला नेण्याचा आपला बेत त्यांनीं हरबाला सांगितला. खुद्द सासरा

आलेला, मग हरबानेंहि नेट धरला नाहीं. भानाजीराव हरणीला आणि तिच्याबरोबर आलेल्या करवल्यांना घेऊन परत गेले.

हरबाला आई नव्हती. त्याचे वडीलहि गेल्याच वर्षी वारले होते. घरांत राहाणारें अगदीं जवळचें असें त्याला कुणीच नव्हतें. इतकें दिवस ठीक होतें; पण आतां रिकामा वाडा त्याला खायला उठला. शेतीवाडींत लक्ष घालण्याचें त्यानें ठरविलें; पण तेथेंहि त्याला गमेना. अखेरीस कंटाळून त्यानें पडगांवला मूळ पाठविलें. पण ज्येष्ठ महिना सरत आला तरी हरणीचा पत्ता नाहीं !

हरबाचे वाडवडील पहिल्यापासून वारकरी पंथाचे होते. त्यांच्या घराण्यांत आषाढ महिन्यांतली पंढरपूरची वारी कधींच चुकत नव्हती. आतां वडील नसल्यामुळें पंढरपूरच्या वारीची जबाबदारी हरबावर पडली. या वर्षीं आषाढी एकादशीला त्याला पंढरपूरला जाणें भागच होतें. आषाढ सुरू झाला. त्यानें पंढरपूरला जाण्याची तयारी चालवली.

आषाढ शुद्ध चतुर्थीला पालखीचा मुक्काम आडगांवला येऊन पडला. दर वर्षींच्या शिरस्त्याप्रमाणें हरबानें वारकऱ्यांना जेवण दिलें. दुसऱ्या दिवशीं सकाळीं पडगांवची धमणी हरबाच्या दारापुढें येऊन थबकली. हरणी खालीं उतरली व वाड्यांत शिरली. हरणीबरोबर आलेल्या गड्यानें हरबाचा निरोप घेऊन धमणी लगोलग मागें फिरविली. हरणीला पहातांच हरबाचें अंग शिरशिरलें. सुमारें एक तासानें पालखी गांवांतून हलणार होती. आतां काय करावें ? हरणी कीं पंढरी ? हरबापुढें मोठा पेच पडला. पंढरीची वारी चुकली, तर स्वर्गांतले पितर आपल्याकडे डोळे फाडून पहातील !—छे, नकोच तें ! मनाला भुरळ पडूं नये म्हणून हरणीशीं कांहीं बोलूंच नये असें त्यानें ठरविलें. भक्तिमार्गाचा विजय झाला. डाव्या खांद्यावर पडशी, गळ्यांत टाळ अडकविलेले, उजव्या खांद्यावर भगवें निशाण व डाव्या हातांत चिपळ्या अशा थाटांत हरबा दाराबाहेर पडला. त्यानें हरणीकडे ढुंकूनहि पाहिलें नाहीं.

पालखी हलली. वारकऱ्यांचा तांडा भजन करीत तिच्यामागून निघाला. कांहीं बायका डोक्यावर तुळशीचीं रोपें घेऊन निघाल्या होत्या. गांवकरी पालखीला पोचवायला वेशीपर्यंत गेले.

पुंडलीक वर दे हरीविठ्ठल, श्रीज्ञानदेव तुकाराम !

वेशीपाशीं झालेला गजर साऱ्या गावांत दुमदुमला. गांवकरी परत फिरले. पालखी पुढें निघाली. गजर अस्पष्ट ऐकूं येईपर्यंत हरणी वाड्याच्या दाराशीं उभी होती.

वरून पावसाची झिम्मड आणि खालीं चिखलाची रबडी यांतून पालखी पंढरपूरची वाट चालत होती. पावसाला न जुमानतां वारकरी लोक भजन करीत पालखीमागून चालले होते. मुक्काम गांवांत पडला तर त्यांच्या जेवणाची सोय होई. आडरानांत झालाच तर पडशींतल्या चणे-कुरमुऱ्यांवर त्यांचें भागत असे.

दशमीच्या दिवशीं पालखी पंढरपुरांत जाऊन पोचली. प्रत्येक वारकऱ्यानें सरकारी कर भरला. गांवातल्या सर्व धर्मशाळा गच्च भरल्या होत्या. कोठें पाऊल ठेवायलाहि जागा नव्हती. चंद्रभागा दुथडी भरून वाहात होती. त्यामुळें वाळवंटांत जागा नव्हती. आभाळ सारखें गळत होतें. हरबानें गांवाबाहेर एका झाडाखालीं आपला तळ ठोकला.

दुसऱ्या दिवशीं हरबानें चंद्रभागेंत स्नान केलें, कपाळावर बुक्का लावला, गालांवर नामाच्या मुद्रा ठोकल्या आणि विठ्ठलाच्या देवळांत जाऊन तो बारी धरून बसला. संध्याकाळच्या वेळीं त्याला गाभाऱ्यांत जायला मिळालें. अेका बडव्यानें त्याचें डोकें धरून मूर्तीच्या पायांवर ठेविलें व दुसऱ्यानें हात धरून त्याला बाहेर काढलें. कृतकृत्य झालेंसें वाटून हरबा देवळाबाहेर आला. मग आपल्या पोटांत कावळे कोकलत आहेत हें त्याच्या लक्षांत आलें. शेंगादाणे व गूळ खरेदी करण्याकरितां तो बाजारांत गेला. या जिनसा घेऊन पैसे देण्याकरितां म्हणून त्यानें कमरेला हात लावला. पण--पण त्याचा पैशांचा कसा कमरेला नव्हता !

ती एकादशी त्याला अनायासेंच निराहार गेली. दुसऱ्या दिवशीं गाडगेबुवांच्या धर्मशाळेंत वर्णी लावून त्यानें द्वादशीचें पारणें फेडलें. पंढरपुरहून रेल्वेनें परत जाण्याचा त्याचा विचार होता; पण आतां कांहीं इलाजच नव्हता. आल्या रस्त्यानें पायींपायींच तो आपल्या गांवीं निघाला. वरून पाऊस, खालून चिखल व पोटांत अन्न नाहीं अशा स्थितींत तो रस्ता तोडीत होता. मोठ्या कष्टानें तो दहा दिवसांनीं आडगांवला जाऊन पोचला. मोठ्या उभारीनें तो आपल्या घराजवळ गेला; पण पहातो तों दाराला कुलूप !

दार उघडून हरबा आंत गेला व पथारीवर पडून राहिला. अठरा दिवसांच्या श्रमानें त्याच्या नसानसांतून शिणवटा भरला होता; त्याचीं हाडें खिळखिळीं झालीं होतीं. संध्याकाळच्या वेळीं तो उठला. घरांत दिवा लावून त्यानें चूल पेटविली व भाताचें भांडें उकडलें. तो भात कसाबसा घशांत लोटून तो अंथरुणावर पडला. हरणी कुठें आहे ? एकटेंच राहाण्याचा कंटाळा आल्यामुळें ती कदाचित् पुन्हा माहेरीं गेली असावी. थोड्याच वेळांत त्याला दगडासारखी झोप लागली.

दुसऱ्या दिवशीं हरबा आपल्या शेतावर निघाला. रस्त्यांत भेटणारे लोक आपल्याकडे चमत्कारिक नजरेनें पहात आहेत असें त्याला दिसून आलें. पंढरपुरहून परत आल्यावर साऱ्या गांवांत बुक्का आणि प्रसाद यांची खैरात करायची हा नेहमींचा रिवाज. पण जवळ तांबडी शिवराई नसल्यामुळें हरबाला हा रिवाज पाळतां आला नाहीं. संकोचामुळें त्यानेंहि भेटलेल्या लोकांशीं बोलणें टाळलें.

शेतावर गेल्यावर त्यानें आपल्या गड्याला बैलगाडी जोडायला सांगितली व त्याला हरणीला आणण्यासाठीं पडगांवला पाठविलें. दुसऱ्या दिवशीं रिकामी गाडी घेऊन गडी परत आला. "बाई पडगांवला न्हाईत." त्यानें हरबाला सांगितलें. हरबाच्या छातींत चर्र झालें !

गांवांतल्या लोकांजवळ हरणीची चौकशी करायची म्हणजे मोठी नामु-

ष्कीची गोष्ट होती. शिवाय गांवांतले लोक आपल्याशीं धड बोलायला तयार नाहींत असें हरबाला दिसून आलें होतें. गड्यांना या बाबतींत विचारतां, ‘ आपल्याला कांहीं माहीत नाहीं. ’ असें सांगून त्यांनीं कानांवर हात ठेविले. आता करायचें काय ? हरणी गेली कुठें ? तिला शोधायचें कुठें ? कदाचित् ती आपल्या एखाद्या मावशीकडे जवळच्या गांवीं गेली असावी, येईल तीनचार दिवसांत, अशी मनाची समजूत घालून हरबा स्वस्थ राहिला.

असे कित्येक दिवस गेले. आतां मात्र हरबा बेचैन झाला. पोरगी बेपत्ता असून भानाजीराव स्वस्थ कसे याचेंच त्याला नवल वाटत होतें. बरें, त्यांना आता कोणत्या तोंडानें भेटायला जायचें ? गांवकऱ्यांशीं या बाबतींत बोलायची तर सोयच नव्हती. अखेरीस निराश होऊन ही गोष्ट विसरण्याचा त्यानें प्रयत्न चालविला. शेतवाडीच्या कामांत त्याचें लक्ष नव्हतेंच. सर्व कामें गड्यांवर सोपवून तो घरीं बसून वेळ काढूं लागला. घरीं बसल्या बसल्या ज्ञानेश्वरी व तुकारामाचा गाथा या दोन ग्रंथांच्या वाचनांत तो वेळ काढूं लागला. मराठी सात इयत्तांपर्यंत त्याचें शिक्षण झालेलें होतें. इतर वेळेला तो एकतारी घेऊन भजन करीत बसे.

एकामागून एक दिवस चालले होते. हरणीचा अजून पत्ता नव्हता. हरबा सारा वेळ घरांत बसून घालवीत असल्यामुळें त्याचा आणि गांवकऱ्यांचा संबंध तुटल्यासारखाच झाला होता. गडीमाणसें एखादे वेळीं येत; पण तीं आपल्याशीं पूर्वीप्रमाणें आदरानें वागत नाहींत असें त्याच्या लक्षांत आलें. देवदर्शनासाठीं म्हणून तो एखादे वेळीं घराबाहेर पडे. गांवकऱ्यांशीं बोलायला त्याला शरम वाटत होती; आणि त्याला पाहिल्याबरोबर गांवकरी कपाळाला आठ्या घालून बाजूनें जात. रस्त्यांतलीं पोरेंसोरें त्याच्याकडे बोटें दाखवून मिस्किलपणें हसत. या सर्व गोष्टी त्याला पूर्णपणें समजत होत्या. पण याला कारण काय हें मात्र त्याला अजून उमगत नव्हतें. पुढें पुढें त्यानें देवदर्शनाला जाणेंहि बंद केलें. धर्मग्रंथांचें वाचन आणि विठ्ठलाचें

भजन यांत तो आपला सर्व वेळ घालवूं लागला. कांहीं दिवसांनीं त्याला परिस्थितीचा विसर पडूं लागला. त्याच्या मनाला एक प्रकारची अपूर्व शांति प्राप्त झाली.

अशा प्रकारें चार महिने गेले. दिवाळी आली तशी गेली. हरबाच्या वाड्यांत दिवे झळकले नाहींत. हरबाला आता हरिणीची आठवणहि होत नसे. पांडुरंगाकडे त्याचें सारें लयलक्ष लागलें होतें. तुकारामाचे अभंग त्याच्या तोंडांत तासन् तास खडीसाखरेसारखे विरघळत. ज्ञानेश्वरीच्या पारायणांत तो पूर्णपणें रममाण झाला होता. स्वतःच स्वैपाक करावा लागत असल्या-मुळें तो अनेक वेळां चुलीला अक्षता लावीत असे. खाण्यापिण्यांत त्याचें मुळींच लक्ष राहिलें नव्हतें. नानापरीचे उपासतापास त्यानें आपल्यामागें लावून घेतले होते. दिवसेंदिवस तो फिक्कट होत चालला. त्याचें शरीर चिपाडाप्रमाणें दिसूं लागलें.

एके दिवशीं त्याला गांवच्या कुलकर्ण्याकडून सरकारी सारा भरण्याचा तगादा आला. सारा भरण्याचें तो विसरूनच गेला होता. दुसऱ्या दिवशीं साऱ्याचे पैसे घेऊन तो चावडीवर गेला. चावडीवर रामराव पाटील बसले होते. त्यांच्याजवळ बजाबा बसला होता. ते दोघेहि चंची उघडून पान खाण्याच्या तयारींत होते. पलीकडच्या बाजूला कुलकर्णी आपलें दप्तर पुढ्यांत घेऊन कांहीं तरी लिहीत होता. अवतीं भोवतीं पांचसात शेतकरी बसले होते. चावडीच्या बाजूला गांवांतलीं दहाबारा उघडीं नागडीं पोरें ठिकऱ्यांचा खेळ खेळत होतीं. हरबाला येतांना पाहून पाटील व बजाबा पानाला चुना लावण्याचें विसरले. एकमेकांच्या कानांजवळ तोंड नेऊन ते कुजबूज करूं लागले. हरबा मुकाट्यानें पायऱ्या चढून वर गेला व त्यानें सगळ्यांना रामराम केला. सरळ पुढें जाऊन तो कुळकर्ण्याजवळ जाऊन बसला. सारा भरून त्यानें पावती घेतली आणि तो उठून जाऊं लागला. पाटलांनीं त्याला हटकलें, “ कां हो हरबा, असं बिगीनं कां जातां ? बसा कीं; जरा पानबीन घ्या. ”

" मी पान खात नसतों. " हरबानें तुटकपणें उत्तर केलें.

" पांडुरंगाच्या नांवानं पान सोडलय् कीं बायकोच्या ? " दात विचकीत हसून बजाबानें विचारलें.

कांहींच उत्तर न करतां हरबा चावडीच्या पायऱ्या उतरूं लागला. शेवटच्या पायरीवर आल्यावर त्याच्या कानांवर शब्द आले, " पडगांवचे पडजावई ! पांडुरग, पांडुरंग ! " यानंतर मोठा हशा.

गांधीलमाशीनें कानाला डंख मारल्याप्रमाणें हरबाला झालें. त्याला पहातांच मघाच्या त्या पोरांनीं ठिकऱ्या टाकून दिल्या व त्याच्यासमोर येऊन रिंगण धरून त्यांनीं नाचावयास सुरवात केली. बाजूला सरकून हरबा रस्त्याकडे वळला. तीं पोरें भसाड्या आवाजांत गाणें म्हणूं लागलीं.

" हरबा करतो हरी, हरी
हरबाची बाईल बजाबाच्या घरीं ! "

हरबाच्या डोळ्यांपुढें लख्ख चक्क झालें. विटकरीचा टोला टाळक्यावर बसलेल्या कुत्र्याप्रमाणें तो पुढें निघाला. घरीं गेल्यावर दोन्ही हातांत डोकें गच्च धरून तो जोत्यावर बसून राहिला.

संध्याकाळच्या वेळीं शेतावरचा एक गडी वाड्यावर आला व हरबाला खळें लावण्यासंबंधीं विचारूं लागला. कांहीं उत्तर न देतां हरबानें त्याला जवळ बोलावून घेतलें व विचारलें, " धोंडबा, माझी बायको कुणाच्या घरीं आहे ? "

" म-मला न्हाई ठ-ठावं. " धोंडबानें चाचरत उत्तर केलें.

" तुला ठाऊक आहे. साऱ्या गांवाला ठाऊक आहे. मला—तिच्या नवऱ्यालाच फक्त ही गोष्ट माहीत नव्हती. सांग, खरं सांग." धोंडीबा बुचकळ्यांत पडला. तो कांहींच बोलेना. हरबा पुढें म्हणाला, " बोल, कुणाच्या घरीं आहे हरणी ? बोललास तर ठीक, नाहीं तर उद्यांपासून माझ्या नोकरीवर नको येऊं. जा. "

" असं नका करूं धनी." तो गडी कळवळून म्हणाला, " बाई-बाई बजाबाच्या घरीं हायेत."

" कधीं गेली ती ?"

" तुमी पंढरपुराला गेलां होतां तवा."

" बजाबानं तिला काढून नेली कीं, ती आपसूख गेली ?"

" धनी, तें मला काईबी ठावं न्हाई."

हरबानें गड्याला परत लावून दिलें. पेटवलेल्या झगरांत खुपसलेल्या जोंधळ्याच्या कणसाप्रमाणें त्याचें डोकें रात्रभर तडतड करीत होतें.

ताठरलेल्या डोळ्यांनीं हरबा सकाळीं उठला, तेव्हां त्याच्या चेहऱ्यावर निश्चयाची झाक होती. तुकारामाचा गाथा आणि ज्ञानेश्वरी या ग्रंथांना रुमाल गुंडाळून त्यानें ते माळ्यावर ठेवून दिले; टाळ आणि चिपळ्या त्यानें अडगळीच्या खोलींत फेकून दिल्या; जोत्याच्या दगडावर त्यानें आपली एकतारी दात खाऊन आपटली—तिचे तुकडे तुकडे झाले ! गळ्यांतल्या तुळशीच्या माळेला त्यानें जोराचा हिसाडा दिला. माळेंतले दाणे घरंगळत घरंगळत चौकांत जाऊन पडले. गांवच्या न्हाव्याला बोलावून त्यानें डोक्यावरल्या जटा काढून डोक्याचा सोललेला नारळ केला. शेतावर जाऊन त्यानें आपली आवडती दुधाळी गाय घरीं आणली. मगनलाल वाण्याच्या दुकानांत जाऊन त्यानें खारीक-खोबऱ्याचें पोतें खरेदी केलें. भिवा सुताराच्या घरीं जाऊन त्यानें त्याला जांबाच्या लाकडाच्या दोन अगडबंब करेली तयार करायला सांगितल्या. संध्याकाळीं बजरंगबलीचें नांव घेऊन त्यानें जोर-बैठकांचा दणका उठवला.

वाड्याच्या मागल्या चौकांत तांबडी माती टाकून हरबानें कुस्तीसाठीं हौदा तयार केला. परगांवचे दोन मस्त पहिलवान बोलावून घेऊन त्यानें त्यांना वाड्यावर ठेवून घेतलें. ते त्याला रोज मालिश करीत. हरबा यांच्या देखरेखीखालीं मेहनत करूं लागला. रोज संध्याकाळीं तो त्यांच्या बरोबर हौद्यांत कुस्तीची लढत करी. ते दोन जवान बाकीच्या वेळीं मस्त

खाऊन हरबाच्या वाड्यांत पडून राहात. वाड्याबाहेर पडायचें नाहीं अशी हरबानें त्यांच्याशीं अगोदरच बोली केली होती.

हरबाच्या वाडयांतले भजनाचे सूर विरून गेले. त्या जागीं मेहनतीच्या डरकाळ्या घुमूं लागल्या. निवृत्तीनें माघार घेतली. प्रवृत्ति पुढें सरकली. देवभक्तीची राख उडून गेली. जातिवंत मराठशाहीचा निखारा धगधग करूं लागला.

अवघ्या तीन महिन्यांत हरबाची कळा पालटली. त्याच्या तोंडावरला पिवळेपणा जाऊन तो लालबुंद दिसूं लागला. त्याची छाती पेलदार झाली, दंडावरल्या बेडकुळ्या फुगल्या आणि त्याच्या मांडयांचे पट फिरले. बोलतांना त्याचा आवाज एडक्याच्या हुंकाराप्रमाणें येऊं लागला. गांवच्या लोकांबरोबर त्याची अजून भाषा नव्हती. सारा कारभार घरांतल्या घरांत ! माजलेला बैल डुरकण्या फोडीत कोंडवाडयांत फिरत होता.

फाल्गुन महिना आला. आडगांवांत दरसालप्रमाणें शिमगा साजरा झाला; पण हरबाच्या वाडयापुढें होळी पेटली नाहीं. ती आज कित्येक दिवस त्याच्या डोक्यांत पेटत होती.

नवें साल उगवलें. घराघरांवर गुढ्या उभारीत चैत्रानें पाऊल टाकलें. जत्रांची झिम्मड गांवगन्ना सुरू झाली. चैत्र वद्य चतुर्दशीला आडगांवला दर वर्षी बहिरोबाची जत्रा भरत असे. आजूबाजूच्या टापूंतले लोक खाऊन पिऊन सुखी असल्यामुळें या जत्रेला चांगलाच रंग भरत असे. काळी चौदस आली. आडगांवांत जत्रेचा धूमधडाका सुरू झाला. गांवाबाहेर बहिरोबाच्या देवळासमोरच्या पटांगणांत माणसांची धूम गर्दी झाली.

दुपार कलली. पटांगणाच्या मध्यभागीं कुस्त्यांचा फड उभा राहिला. ढोलक्यांचा आवाज घुमूं लागला. जागा खणून हगामा अगोदरच तयार केलेला होता. कोल्हाट्यांचे खेळ बंद झाले. दरवेशांचीं अस्वलें नाचायचीं थांबलीं. माकडांच्या उडयांना खंड पडला. पाळणे फिरतांना थबकले.

सारे करमणुकीचे प्रकार बंद पडले. फडाच्या पोळ्याभोवतीं सारे लोक मधमाशांप्रमाणें घोंगावत गोळा झाले.

जत्रेच्या अगोदर एक महिनाभर आसपासच्या गांवीं वर्गणी गोळा करण्यांत येत असे. गोळा झालेल्या पैशांतून जत्रेंत कुस्ती जिंकणाऱ्या पहिलवानांसाठीं मुंडाशीं व चांदीचीं कडीं खरेदी करीत. रामराव पाट·लांना तालमीचा व कुस्तीचा भारी शौक होता. आतां त्यांचें वय झालें होतें; पण उमेदींत असतांना त्यांनीं मोठमोठ्या कुस्त्या मारल्या होत्या. ते दर सालीं एक सोन्याचें कडें जत्रेसाटीं बहाल करीत. कुस्त्यांच्या दंग-लींत अजिंक्य ठरणाऱ्या पहिलवानाला हें सोन्याचें कडें इनाम मिळे.

आखाड्याच्या पश्चिम बाजूला रामराव पाटील बसले होते. त्यांच्या शेजारीं त्यांचा उजवा हात बजाबा मांडी घालून बसला होता. बजाबाहि कसलेला पहिलवान होता. त्याच्या ताकदीचा दरारा त्या टापूंत चांगलाच पसरलेला होता. रामराव पाटलांचें सोन्याचें कडें त्यानें कित्येक वेळां पटकावलें होतें. गेल्या तीनचार वर्षांत मात्र तो हगाम्यांत उतरला नव्हता. आखाड्याच्या चारहि बाजूंना पंच उभे होते. भोवतालीं साऱ्या बाजूंना लोकांची ठेचून गर्दी झाली होती.

प्रथम पोरासोरांच्या कुस्त्या सुरू झाल्या. चारचार पांचपांच जोड्या त्या प्रशस्त आखाड्यांत एकमेकांना भिडल्या. एक गडी चीत होऊन कुस्ती संपली कीं, जिंकणाऱ्या गड्याला बत्ताशांचा पुडा मिळे. सुमारें अर्ध्या तासानें कुस्त्यांच्या बारक्या जोड्या संपल्या. गांवागांवाहून आलेले पहिलवान जांगे कसून आखाड्यांत उभे राहिले. कलत्या सूर्याच्या उन्हांत मालिश केलेलीं त्यांचीं शरिरें चमचम करीत होतीं. त्यांच्या दंड ठोक-ण्याच्या आवाजानें सारें मैदान दणाणून गेलें.

पहिलवानांच्या कुस्त्या सुरू झाल्या. सलामी झाली रे झाली कीं, त्यांचीं तुळतुळीत शरिरें एकमेकांना भिडत व डावपेचांना सुरवात होई. दंडावर दंड, मांडीला मांडी किंवा छातीला छाती घासतांना शेराचे फोक एक-

मेकांवर घासल्यासारखा आवाज होई. चीतपट करणाऱ्या पहिलवानाला त्याच्या कुवतीप्रमाणें मुंडासें अगर चांदीचें कडें मिळे. ढोलकीं जोर-जोरानें वाजत होतीं. लोकांचा जमाव अधाशीपणानें कुस्त्या पहात होता. एकाद्या पहिलवानाची पाठ जमिनीला लागली कीं, ते कसून टाळ्या पिटीत व एकच गलका होई.

चांदीच्या कड्यांची खैरात संपली. सोन्याच्या कडयासाठीं सामना सुरू झाला. त्या टापूंत उंबरगांवचा झिंग्या भिल्ल पट्टीचा कुस्ती खेळणारा म्हणून मशहूर होता. गेलीं दोन वर्षे रामरावचें सोन्याचें कडें त्यानें जिंकलें होतें. झिंग्या आखाडयांत उतरला. त्याचें पिळदार व काळें कुळकुळीत अंग शाळिग्रामासारखें चमकत होतें. दोनतीन राखीव जवान पुढें आले. गडी पुढें आला कीं, झिंग्या एका नजरेंत त्याचें पाणी जोखीत असे. पहिल्या दोन जवानांना त्यानें हां हा म्हणतां माती चारली. तिसरा जवान भारी होता. त्यानें झिंग्याबरोबर चुरशीची लढत केली. कुस्ती बराच वेळ चालली होती. अखेरीस त्या तिसऱ्या पहिलवानाचें नाक वर झालें! लोकांनीं दात खाऊन टाळ्या पिटल्या. झिंग्या विजयी मुद्रेनें हसत होता. हसतांना त्याचे कवडयासारखे पांढरे दात काळ्या रंगांत उठून दिसत होते. सोन्याच्या कडयावर त्याचा हक्क तिसऱ्यांदा लागू झाला. रामराव पाटील उठून उभे राहिले. त्यांच्या उजव्या हातांत सोन्याचें कडें लकाकत होतें.

इतक्यांत गर्दीतून, 'थांबा' असे शब्द आले. हरबा गर्दीतून पुढें येत होता. साऱ्या लोकाच्या नजरा त्यांच्याकडे वळल्या. हरबा आखाडयांत येऊन उभा राहिला व शांतपणें म्हणाला, "मला लढत करायची आहे."

हा टाळकुट्या हरबा झिंग्याशीं लढत करणार? लोकांत एकच हशा पिकला. रामराव पाटील गालांतल्या गालांत हसत खालीं बसले आणि त्यांनीं बजाबाला एक ढुसणी दिली. खो खो हसून बजाबानेंहि त्यांना साथ दिली. हरबानें मुकाट्यानें धोतर काढून बाजूला ठेविलें. त्यानें जांग्या कसून

ठेवलेला होताच. अंगांतली पैरण काढून त्यानें दण्णादिशीं दंड थोपटले व बैठका मारायला सुरवात केली. हरबाचें पिळदार शरीर पाहून लोकांचा हशा थांबला. त्याचा दंड थोपटण्याचा आवाज ऐकून आणि बैठका काढण्याचा आवेश पाहून लोकांचे चेहरे एकदम गंभीर झाले. झिंग्या एकसारखा डोळे विस्फारून हरबाकडे पहात होता. पंचांनीं 'हूं' म्हणतांच दोघेहि गडी पुढें सरकले. त्यांची सलामी झाली.

कुस्ती जुंपली. दोघेहि गडी ताकदवान व चपळ होते. झिंग्या तर डावपेचांत वस्तादच होता. हरबाचीहि तयारी कमी दिसली नाहीं. सूर्य मावळत चालला होता. त्याच्या तांबूस पिवळ्या प्रकाशांत दोघांची चाललेली लढत लोक पापणी न ढळवतां पहात होते. रामराव पाटील व बजाबा या दोघांनींहि आपापल्या मांड्या हलवल्या व ते चवड्यावर बसून या जोडीकडे पाहूं लागले.

एक काळाशार व दुसरा पिवळाधम्मक असे दोन नागच जणूं काय फुसफुस करीत एकमेकांशीं भिडले होते. झिंग्यानें हरबाविषयीं केलेला पहिला अंदाज सफा चुकला. हलक्या गड्याशीं खेळतांना येणारा बेदरकारपणा प्रथम त्याच्या खेळण्यांत दिसत होता; पण पुढें तो कमी झाला. आपल्या डावपेचांना मिळणारीं पलटउत्तरें पाहून तो जपून खेळूं लागला. हरबा पहिल्यापासून धिम्मेपणानें खेळत होता. ताकद रेड्याची आणि चपळाई सापाची अशा झिंग्याशीं कुस्ती करणें म्हणजे तोंडची गोष्ट नव्हे हें तो जाणून होता. पहिल्यांदाच हगाम्यांत उतरणाऱ्या हरबाचा आत्मविश्वास पाहून लोकांना अचंबा वाटत होता.

कुस्तीला सुरवात होऊन पाव तास लोटला. कोणीच हार खाण्याचें चिन्ह दिसेना. झिंग्याची पोलादी छाती लोहाराच्या भात्याप्रमाणें खालींवर होऊं लागली. हरबालाहि चांगलाच दम लागला होता. दोघांचीं शरिरें घामानें न्हाऊन निघालीं. ओल्या अंगाला ठिकठिकाणीं माती चिकटल्यामुळें हरबा बिबळ्या वाघासारखा दिसत होता. दोघेहि गडी मागें सरकले व

त्यांनीं मिनिटभर दम घेतला. दोघेहि एकमेकांकडे रोखून पहात होते. एवढी जबर गर्दी, पण चोहीकडे रात्र पडल्यासारखी शांतता होती. लोक आपापले श्वास रोखून या अचाट कुस्तीकडे पहात होते.

दोघेहि गडी पुन्हां भिडले. थोडा वेळ त्यांची अटीतटीची झटापट झाली; पण कोणीच कोणाला आटोपेना. हरबासारख्या नवशिक्या गडायनें आपल्याला इतकें होलपटावें या कल्पनेनें झिंग्याला चीड आली. त्याच्या लालबुंद डोळ्यांत विखार चढूं लागला. हरबाला आपल्या ताकदीचा हिसका दाखविण्याचें त्यानें ठरविलें. झिंग्याचा चढाईचा हिय्या बघून हरबा तयारींत उभा राहिला. अर्धा मिनिट थबकून झिंग्यानें हरबाला टाळूपासून घोट्यापर्यंत न्याहाळलें आणि पुढें झेपावून त्यानें आपल्या उजव्या हातानें हरबाचें मनगट पकडलें आणि करकचून आवळलें. हरबा होता तसाच उभा राहिला. लोक तोंडातला आवंढा गिळण्याचेंहि विसरले. झिंग्यानें हरबाचा हात पिळावयास सुरवात केली. हात पिळून तो उखड-ण्याचा प्रयत्न करणें कुस्तीच्या नियमांना धरून नव्हतें. पण या दोघांची ती जबरदस्त लढत पाहून पंच भांबावल्यासारखे झाले होते. त्यांना मध्यें पडायचें सुचलेंच नाहीं. हरबा अजूनहि तसाच उभा होता. झिंग्या डिव-चलेल्या अस्वलाप्रमाणें गुरगुरत होता. इतक्यांत काय झालें कुणास ठाऊक! हरबानें कोणता पेंच केला हें लोकांना समजलेंहि नाहीं. त्यांच्या चकलेल्या नजरेला हरबानें झिंग्याला डोक्यावर उचलून धरल्याचें दृश्य दिसलें. एकवार स्वतःभोंवतीं फिरून हरबानें झिंग्याला लाकडाच्या मोळीप्रमाणें खालीं फेकून दिलें. झिंग्याच्या पाठीला माती लागली. लोकांत एकच हलकल्लोळ झाला! सर्वजण उठून उभे राहिले. त्यांच्या टाळ्यांच्या कड-कडाटानें कानठळ्या बसण्याची भीति वाटून सूर्य डोंगराआड झाला. हा आवाज बाहिरोबाच्यासुद्धां कानांत शिरला असेल.

थोड्या वेळानें सर्व लोक शांत होऊन खालीं बसले. झिंग्या खालीं मान घालून कपडे चढवीत होता. रामराव पाटील उभे राहिले व त्यांनीं

तें कडें हरबाच्या हातांत घालून त्याची पाठ थोपटली. पाटील खालीं बसले. हरबा आपल्या गुडघ्यांवर हात ठेवून बजाबाच्या पुढें पवित्र्यांत उभा राहिला आणि सोन्याचें कडें घातलेल्या उजव्या हातानें त्यानें आपला डावा दंड थोपटला. कुस्तीच्या मेहनतीनें त्याच्या दंडाचे व छातीचे स्नायू दुप्पट फुगले होते. शेपटी आपटून हत्तीवर झेप घालणाऱ्या सिंहासारखा दिसत होता तो. बजाबा खालीं मान घालून स्तब्ध बसला होता. कळस मोडलेल्या देवळाची कळा त्याला आली होती. गडगडणाऱ्या ढगांच्या आवाजांत हरबा त्याला म्हणाला, "बजाबा, तुझ्याशीं कुस्ती लढण्याची माझी असोशी आहे. येतोस का आखाड्यांत ?"

बजाबानें मान वर केली नाहीं. लोक या प्रकाराकडे स्तिमित नजरेनें पहात होते. हरबानें पुन्हां दंड थोपटले व तो गर्जून म्हणाला, "लोकांच्या बायका पळविणारा मर्द तूं ! कुस्तीला मागं सरतोस ? थू : तुझ्या जिनगानीवर !"

हजारों लोकांच्या जमावांत हरबा बजाबाच्या तोंडावर थुंकला. बजाबानें कांहींच चुळबूळ केली नाहीं. हरबा मागें सरकून आखाड्यांत आला. त्यानें आपलें हातांतलें कडें काढून तें पंचांच्या हातांत ठेवलें आणि त्या कड्याचा सोन्याचा कळस करून तो बहिरोबाच्या देवळावर चढविण्यास सांगितलें. लोकांनीं टाळ्या वाजवून हरबाच्या देणगीचें कौतुक केलें.

हरबानें कपडे घातले. लोकांनीं त्याच्या डोक्यावर नवा जरीचा पटका चढवला आणि त्याच्या गळ्यांत फुलांच्या माळा घातल्या. ताशेवाजंत्र्या वाजूं लागल्या. लोकांनीं हरबाच्या नांवाच्या जयजयकार केला. त्यांच्या खांद्यांवरून हरबाची मिरवणूक निघाली. लोकांचे लोंढेच्या लोंढे मिरवणुकींत सामील झाले व ती बाजारपेठेकडे वळली. चौकाचौकांतून मिरवणूक पुढें चालली. घरांच्या ओट्यांवरून, दारांतून व खिडक्यांमधून बायकांमुळें गर्दी करून उभीं होतीं. अंधार पडूं लागल्यामुळें लोकांनीं मशाली पेटवल्या. हरबाच्या मागून पुढून चार गॅसच्या बत्त्या चालूं

लागल्या. मिरवणूक बजाबाच्या वाड्यावरून गेली. हरबानें मान ढळवली नाहीं. घाबरून झुडुपाआड दडलेल्या हरिणीप्रमाणें हरणी माडीवरच्या खिडकींतून तोंड बाहेर न काढतां हरबाकडे पहात होती.

मिरवणूक संपली. हरबाची तोंड भरून वाखाणणी करीत लोक घरोघर पांगले. हरबा घरीं गेला. विजयाच्या नशेमुळें त्याला लवकर झोप आली नाहीं. आणि...आणि अजून तर सगळें पुढेंच होतें. पूर्वरंग संपला होता. उत्तररंग अजून व्हायचा होता.

दुसरा दिवस उजाडला. दिवस असा कासराभर वर आला असतांना हरबा घराच्या बाहेर पडला. त्याच्या हातांत कळकाची लांबलचक काठी होती. पायांतल्या वहाणा करकर वाजवीत छाती काढून तो बाजारपेठेंतून चालला. त्याचें वटवाघळासारखें जिणें आतां संपलें होतं. रस्त्यांतून जाणारे गांवकरी त्याला रामराम करीत होते. दुकानांतले वाणिये त्याला 'जय गोपाळ, हरबा!' म्हणून पुकारीत होते. अभिवादनांचा स्वीकार करीत हरबा बजाबाच्या वाड्याच्या रोखानें निघाला. बजाबाच्या वाड्याजवळ आल्यावर तो थबकला व त्यानें बजाबाच्या नांवानें आरोळी ठोकली. बजाबा बाहेर आला. हरबाला पहातांच त्याच्या छातींत हूक भरली. पण तसें कांहीं दिसूं न देतां तो दारांत येऊन उभा राहिला. हरबाचा नूर पाहून बरेच लोक त्याच्या पाठोपाठ निघाले होते. त्याची आरोळी ऐकून आजूबाजूच्या घरांतले लोक दारांत येऊन उभे राहिले.

"मी तुझ्या बायकोला घरांतून बाहेर काढण्यासाठीं आलों आहें." हरबा गरजला. बजाबा गप्प उभा राहिला. हरबा पुढें म्हणाला, "माझी पाठ फिरल्यावर एखाद्या चोराप्रमाणें तूं माझ्या बायकोला पळवलंस. मी आज दिवसाढवळ्या, देखतडोळा तुझ्या बायकोला घरांतून बाहेर काढून नेणार."

"म-माझ्या बायकोला?"

"होय, तुझ्या बायकोला–हरणीला. ती तुझी बायकोच नाहीं तर काय !"

बजाबा थोडा वेळ थांबला. एव्हांना रस्त्यावर लोकांची खूपच गर्दी जमली होती. त्यानें एकवार लोकांकडे पाहिलें व छाती करून तो हरबाला म्हणाला, "ती घराबाहेर येणार नाहीं."

"येणार नाहीं ? झिंज्या धरून तिला बाहेर खेचीन. आणि तुला—" वाक्य पुरें न करतां हरबानें बजाबाचा हात धरून त्याला बाहेर ओढलें. बजाबा हेलपाटे खात उभा राहिला. तो पुरा भांबावून गेला होता. हरबाला चांगलाच चेव चढला होता. लोकांच्या गर्दींतून कोणी पुढें आलें नाहीं; कोणी मधें पडलें नाहीं. हरबा काठी उगारून म्हणाला, "बोलावतोस कीं नाहीं तिला बाहेर ? बोल."

तरीहि बजाबा बोलेना. हरबानें त्याच्या अंगावर सपासप काठ्या मारायला सुरवात केली. चार काठ्यांतच बजाबा झांबून खालीं पडला. हरबानें हात आखडला व खालीं वाकून त्याला गदगदा हलवलें. बजाबाच्या तोंडांतून फेस येत होता. त्याला तसाच सोडून देऊन हरबा दरवाजांत गेला व ओरडून म्हणाला, "हरणे, बाहेर ये."

हरणी थरथर कापत त्याच्यासमोर येऊन उभी राहिली. तिचा उजवा हात धरून हरबानें तिला बाहेर ओढलें. उजव्या बगलेंत काठी धरून तो डाव्या हातानें हरणीला फरफटत घेऊन निघाला. लोकांनीं बाजूला सरून त्याला वाट करून दिली. याच पद्धतीनें भर बाजारपेठेंतून तो हरणीला आपल्या घरीं घेऊन गेला.

हरणी आंतल्या घरांत गेली. हरबा ओसरीवर लोडाला टेकून पडला. आढ्याकडे पहात तो किती तरी वेळ विचार करीत होता ! हरणीला तर आणली, बजाबाचेंहि नाक कापलें; पण आतां पुढें काय ? हरणीला घरीं कसें ठेवायचें ? बरें, घरीं ठेवायचें नाहीं तर घाडायचें कुठें ? पोरीनें नाचक्की केली म्हणून भानाजीराव तिच्याकडे ढुंकूनहि पहायला तयार

नव्हते. आणि आपली अब्रू धुळींत मिळवायला एकटा बजाबाच नव्हे, तर हरणीहि कारण आहे. बजाबाचा तर सूड उगवला; आतां हरणी राहिली !

बारा वाजण्याच्या सुमारास हरणी बाहेर आली आणि म्हणाली, "कारभारी, जेवायला चला." तास दीड तासांत हरणीनें स्वैपाक तयार केला होता. न ऐकल्यासारखें करून हरबा तसाच पडून राहिला. त्यानें तिच्याकडे पाहिलेंहि नाहीं. हरणी थोडा वेळ थांबली. हरबा ऐकत नाहींसें पाहून ती पुढें आली व त्याचे पाय धरून हमसाहमशीं रडूं लागली. ती बराच वेळ रडत होती. तिचें रडें ओसरल्यावर हरबा उठून बसला व त्यानें तिचें डोकें वर केलें. हरणी हुंदके देत म्हणाली, "माझी कांहीं चूक नाहीं; खरंच माझी कांहीं चूक नाहीं."

हरणीच्या केविलवाण्या चेहऱ्याकडे आणि पाणावलेल्या डोळ्यांकडे पाहून हरबा विरघळला. त्यानें तिच्या पाठीवरून हात फिरवला आणि तिला विचारावयास सुरवात केली. हुंदके देत व डोळे पुशीत तिनें सर्व हकीकत हरबाला सांगितली.

हरणीला एका शब्दानेंहि न विचारतां हरबा पंढरपूरला गेल्यावर तिला त्या भकास वाड्यांत एकटीला राहाणें गमेना. तिला भीति वाटूं लागली. सोबतीला कुणीच नव्हतें. संध्याकाळच्या वेळीं शेतावरले गडी येत, कांहीं हवें-नको विचारीत व परत जात. असे तीनचार दिवस गेले. मग एके दिवशीं गोजराबाई-तिची दूरची बहीण, बजाबाची दुसरी बायको-अवचित तिच्याकडे आली. हरणीची विचारपूस केल्यावर तिनें तिला हरबा पंढरपुराहून परत येईपर्यंत आपल्या घरीं राहायला बोलावलें. हरणीला त्यांत वावगें कांहीं न वाटून तिनें तें कबूल केलें. वाड्याला कुलूप लावून ती गोजराबाईबरोबर तिच्या घरीं राहावयास गेली.

एकदोन दिवस गेल्यावर बजाबानें हरणीशीं चघळपणा करायला सुर-

वात केली. तिची चेष्टा करतांना तो आपल्या बायकांचीहि कदर ठेवीत नसे. त्याची पहिली बायको सरळ, साधी होती बिचारी. ती लगेच उठून दुसरीकडे निघून जात असे. गोजराबाई मात्र 'ही ही' करीत तिथेंच उभी राही; ती हरणीला उठून जाऊं देत नसे. हरणीला इकडे आड व तिकडे विहीर असें झालें. हरबाचा अजून पत्ता नव्हता. हरणी त्या वाडयांत तापल्या तव्यावर उभी राहिल्याप्रमाणें राहात होती. अखेरीस तिनें गोजराबाईजवळ घरीं जाण्याची गोष्ट काढली. गोजराबाईनें त्यांत मोडता घातला. हरणीनें वाडयाबाहेर पडूं नये यासाठीं बजाबानें कडक बंदोबस्त केला. हरिणी जाळ्यांत अडकली.

त्याच दिवशीं हरबा यात्रेंत पटकीनें मेल्याची बातमी बजाबानें हरणीला सांगितली. हरणीला रडून भुई थोडी झाली. तिनें आपल्या अंगावरलीं अहेवलेणीं काढून टाकलीं. दुसऱ्या दिवशीं माहेरीं जाण्याचा आपला बेत तिनें गोजराबाईला सांगितला. गोजराबाईनें आपलीं नखें बाहेर काढलीं. ती म्हणाली, "इथून पुढं तुझं माहेर आणि सासर हेंच!"

हरणीनें बरेंच आकांडतांडव केलें; पण त्याचा कांहींच उपयोग झाला नाहीं. गोजराबाईनें तिला एका खोलींत कोंडून ठेवलें.

हरणी आपल्या घरांत शिरल्याची कंडी बजाबानें गांवांत पिकवली. ही बातमी हां हां म्हणतां आसपासच्या टापूंत पसरली. भानाजीरावला हें कळतांच त्यानें कपाळावर हात मारला व पोरीच्या नांवानें सुतक धरलें. लोकांना ही बातमी ऐकतांच कसेंसेंच वाटलें. या सुमारास हरबा परतीची वाट चालत होता.

कांहीं दिवसांनीं हरबा परत आल्याचें हरणीला समजलें. तिनें गळ्यांत मंगळसूत्र घातलें व कुंकू लावायला सुरवात केली. तिनें खूप चडफड केली; पण तिचा कांहींच उपयोग नव्हता. वाड्याच्या चार भिंतींच्या बाहेर जायला तिला पूर्ण मज्जाव होता. हरबा आपली सुटका करील अशी तिला बरेच दिवस आशा होती. कारभारी इतके निसूर कसे बसून राहिले

याचें तिला फार नवल वाटत होतें. जास्त दिवसगत झाल्यावर तिची आशा खुंटली व नशिबावर हवाला टाकून ती तें बंदी जीवन कंठूं लागली.

हरणीच्या तोंडून ही सर्व हकीकत ऐकल्यावर हरबाला आपल्या वागणुकीचा पस्तावा झाला. हरणीनें त्याचे पाय घट्ट धरून ठेवले. ती ते सोडीना. हरबानें तिची समजूत घातली. ती आंत गेली. हरबाहि आंत गेला व जेवायला बसला.

वैशाख महिना उजाडला. लगीनसराई सुरू झाली. गांवगन्ना ताशे-वाजंत्र्या वाजूं लागल्या. चारच दिवसांनीं पहिला मुहूर्त होता. या मुहूर्ता-वर हरबानें हरणीबरोबर म्होतूर लावलें. हें म्होतूर गेल्या वर्षी झालेल्या त्यांच्या लग्नापेक्षां जास्त गाजलें.

---

# दौलतजादा ५

कधीं कुणाला सांगूं नये अशी गोष्ट मी आज तुम्हांला सांगणार आहे.

गोष्टींचे दोन प्रकार आहेत. तुम्ही ज्या गोष्टी ऐकतां अगर वाचतां त्या बनवून सांगितलेल्या असतात. हा झाला पहिला प्रकार. दुसऱ्या प्रकारच्या गोष्टींत मनुष्य स्वतःच बनलेला असतो. म्हणूनच तो त्या मनाच्या सांधी-कोपऱ्यांतून बाहेर काढीत नाहीं.

मला स्वतःला गोष्ट बनवून सांगतां येत नाहीं. कोपरगांवसारख्या छोट्या गांवात राहाणारा मी एक शेतकरी. मला तें कसं जमणार ?

बऱ्याच वर्षांपूर्वीची गोष्ट. त्या वेळीं कोपरगांवच्या पंचक्रोशींत धुव्वा-धार पाऊस पडे. सारीं शेतं ज्वारीबाजरीच्या धाटांनीं फुलून जात. सरत्या पाणकळ्यांत गहू–हरबऱ्यांचा पेरा होई. थंडीची हुडहुडी सुरू झाली कीं, दहिंवदाण्यांची पखरण पडे आणि ओंब्याओंब्यांतून व घाटयाघाटयांतून दाणे मस्त पोसत. शेतकरी भारी आनंदांत असत. आता उसाच्या फडांनीं सारं गांव मैलोमैल घेरलं आहे. पाटाचं पाणी शेताशेतांतून सापाच्या गतीनं शिरत आहे. शेतकरी लोक स्वतःच्या शेतांतून शेटियांच्या उसांची लागण करीत आहेत. कित्येकांचीं हाडं साखरेच्या कारखान्यांत घुसळलीं जात आहेत.

त्या वेळीं कोपरगांवांतला व्यापार हा असा वारेमाप वाढला नव्हता. गाव कसं टामटुमीत, स्वच्छ आणि सुरेख होतं. लोक सुखी होते. आतां व्यापाऱ्यांच्या नजरा फाटल्या आहेत. माणसाला माणूस ओळखीत नाहीं. सारं गांव गुळाच्या ढेपांनीं गच्च भरलं आहे. इकडे पहावं तर माशा आणि तिकडे पहावं तर मुंगळे !

माझे वडील म्हणजे कोपरगांवांतली मोठी आसामी होती. गांवालगतच आमच्या मालकीचे जमिनीचे तक्तेच्या तक्ते होते. शाळूची कोरडवाहू,

गव्हाची पाणभरी, संत्र्यांच्या बागा, मोसंबीच्या बागा—किती किती म्हणून सांगूं ? आतां मजजवळ काय आहे म्हणून विचारतां ? सांगण्यासारखं असं आतां माझ्याजवळ कांहींच नाहीं. त्या वेळीं मी राव होतों, आतां रंक आहे; एवढ्यांत काय तें समजून घ्या. एवढा फरक कसा पडला म्हणून विचारतां ? अहो, त्यासाठींच तर मीं या गोष्टीला सुरवात केली आहे.

आमच्या गांवांत एक छोटीशी शाळा होती. वडिलांच्या आग्रहाखातर मी शाळेंत जात असें. चवथं कीं पांचवं बुक शिकत होतों मी. पण शाळेच्या चार भिंतींतली डांबण जिवाला जाचत असे. शाळेला मध्येंच सुट्टी देऊन मीं गोदावरीच्या पाटावर जावं नी तासन् तास पाण्यांत डुंबत बसावं. सुट्टीच्या दिवशीं लांबलांबच्या रानांत हिंडायला जावं आणि कौठं, बोरं नी चिंचा यांचा फडशा उडवावा. घरून निघतांना मिठाची पुरचुंडी खिशांत घ्यावी आणि नदीपलीकडच्या शेलारांच्या आंबराईत जाऊन दगडांनीं कैऱ्या पाडाव्या आणि त्या मीठ लावून खाव्या. असा आमचा खाक्या होता. जोडीला नेहमीं तीन चार सोबती असत.

मीं खूप शिकावं आणि मोठं व्हावं अशी बाबांची असोशी होती. पण शिकण्यांत माझं लक्ष लागत नव्हतं. शेवटीं हो-ना करतां करतां मी शाळा सोडून दिली. मी लहान असतांनाच आई वारली होती. आई-वेगळ्या पोरामागं शाळेची तंगी लावण्याचा आग्रह बाबांनीं धरला नाहीं. उनाडक्या करायला मी मोकळा झालों.

होतांहोतां मी मोठा झालों. मला मिसरूड फुटूं लागली. मी बाबांना एकुलता एक होतों. त्यांचा माझ्यावर फार जीव होता. माझी परवड होऊं नये म्हणून त्यांनीं मला दुसरी आई घरांत आणली नाहीं. माझ्याकडे पाहून ते दिडकीला दिडकी लावीत असत. पूर्वापार चालत आलेल्या दौलतीचा त्यांनीं चांगला सांभाळ केला होता. एकादे वेळीं ते मला म्हणायचे, “ शिवराम, वडिलांची दौलत मीं जतन केली. माझ्या मगदुरापरी तिच्यांत थोडी फार भर घातली. ही सारी दौलत तुझीच आहे. तूं आतां मोठा

झाला आहेस. कामधंद्यांत लक्ष घाल. व्यवहार पहात जा. उनाडक्या पुरे कर. निदान ही दौलत अशीच्या अशी तुझ्या पोराबाळांच्या हवालीं कर.''

बाबा असं बोलूं लागले म्हणजे मी घुम्म बसून राहायाचा. त्यांना मी काय उत्तर देणार? माझ्यावर असलेल्या जबाबदारीची मला काडीमात्र जाणीव नव्हती. कामधंद्यांत लक्ष घालणं माझ्या जिवावर येई. व्यवहार पहायला मी हिरवाकच्चा होतों.

शेतकऱ्याची जात म्हणजे इथून तिथून दिलदार व भोळवट. गडी प्रेमांत आला तर अंगावरली लंगोटीसुद्धां काढून देईल. आमच्या टापूंतले शेतकरी त्या वेळीं सुखी होते; दोन पैसा बाळगून होते. गाडीघोडा आणि नाचरंग यांत ते पाण्यासारखा पैसा खर्च करीत.

त्या वेळीं गांवोगांव जत्रा भरत असत. आतांहि भरतात; पण ती सर नाहीं यायची! जत्रा म्हटली की हा तोबा उडायचा! मुंग्यांसारखी माणसांची रीघ लागायची. गाड्याघोड्यांनीं सारं मैदान गच्च भरून जात असे. शेकड्यांनीं बकरीं कापलीं जात; आणि कोंबड्यांची तर गोष्टच विचारूं नका!

जत्रेच्या ठिकाणीं दूरदूचे तमाशे येत असत. नाचणारणींचे ताफ्यांचे ताफे नाचायला येत. देवापुढं भंडारा काय उधळला जातो, इतका पैसा लोक नाचणारणींच्यावर उधळीत. कलदार रुपये अंगावर पडून त्यांच्या बांगड्या पिचत; चवल्यापावल्यांचा तर पाऊस पडे!

चार सोबती बरोबर घेऊन जत्रेला जाणं हा माझा नेहमींचा सराव. पोरसवदा होतों तोंपर्यंत मला तमाशाचं कांहीं वाटत नसे. पण हनुवटीवर जसजशी लव वाढूं लागली तसतसे मनाला फाटे फुटूं लागले. तमाशांत जीव रमूं लागला. गंमतींत गंमत वाटूं लागली. अहो विचारतां काय? तमाशा म्हणजेच गंमत!

इतके दिवसपर्यंत मी जत्रेसाठीं जत्रेला जात होतों. आता जत्रेंतल्या गंमतीसाठीं जत्रेला जाऊं लागलों. इतके दिवसपर्यंत मी नुसतीच गंमत

पहात असे. आता गंमत पहातांना मी खिशांत हात घालूं लागलों. नाचणारणीला दौलतजादा केल्याशिवाय तमाशा पहातांना लज्जत येत नाहीं. आणि मी पडलों थोरामोठ्यांचा—कोपरगांवच्या हणमंतराव पाटलांचा—मुलगा. दौलतजादा केली नाहीं, तर वडिलांची इभ्रत काय राहिली !

त्या वेळीं दौलतजादा न करणं कमीपणाचं समजलं जात असे. आतां लोक दौलतजादा करतात किंवा काय तें मला माहीत नाहीं; आणि दौलतजादा करण्यांत मोठेपणा मानतात किंवा नाहीं हेंहि माहीत नाहीं.

माझ्या या रंगढंगाची कुणकुण बाबांच्या कानांवर गेली. पण ते मला कांहीं बोलले नाहींत. जत्रेला निघतांना मी त्यांच्याजवळ जास्त पैसे मागूं लागलों. तेहि मला मुकाट्यानं देऊं लागले. एवढं बरीक खरं, कीं ते आतां माझ्या लग्नाच्या खटपटीला जारीनें लागले.

कुळवंत मराठ्याचं गबर स्थळ. पोरींना काय तोटा ? खंडी खंडी पोरी सांगून येऊं लागल्या. सकाळपासून संध्याकाळपर्यंत घरांत लग्नाच्या गोष्टी घुमूं लागल्या. तरी बरं, कीं घरांत आई नव्हती. नाहीं तर तिनं माझं हाड भरण्यापूर्वीच मला पिवळं केलं असतं.

लग्नाच्या बाबतींत बाबांनीं मला कधीं विचारलंच नाहीं. त्यांत विचारायचं काय ! कच्चा आवा हा भाजून काढायलाच पाहिजे. रीतशीर होतं तें. झालं, लग्न ठरलं ! वाघिन्सा झाला. पुढल्या महिन्यांतला पहिला मुहूर्त ठरला.

घरांत लग्नाची गडबड सुरू झाली. जातीं घरघर करूं लागलीं. सुपं फडफड वाजूं लागलीं. पाव्हण्यांचा राबता सुरू झाला. रावळ्यांचा पायरव वाढूं लागला. आणि—आणि एक दिवस बाबांना वाखाचा झटका आला. वैद्य आले, डॉक्टर आले, वैदू आले, देवऋषि आले; पण सगळे आले तसे गेले. बाबांना आलेलं देवाघरचं बोलावणं कुणालाच टाळतां आलं

नाहीं ! पोराच्या लग्नाचं लाडकोड न करतां, दौलतीची वारासारी न करतां बाबा निघून गेले. मी पोरका झालों !

छू मंतर केल्याप्रमाणें लगीनघर ओस पडलं; येऊं घातलेल्या सुनेचा पायगूण वाईट ठरला. ठरलेलं लग्न मोडलं.

बाबांचं सुतक मी सहा महिनेपर्यंत कडकपणानें पाळलं. घराबाहेर पडलों नाहीं; अगदीं हूं केलं नाहीं कीं, चूं केलं नाहीं. नंतर दुःखाचा विसर पडत चालला. दुःखावर फुंकर घालायला स्नेह्यासोबत्यांची आवकजावक होतीच.

जवानीचं ताजं रक्त. त्यांत कुणी बोलणारं नाहीं. स्वभाव पहिल्यापासून टौरी आणि खर्चायला पैसा मुबलक; मग काय विचारतां ! हाड निब्बर आणि पैसा गब्बर असल्यावर मनुष्य काय करील, याचा कांहीं नियम नाहीं. मी मोकाट सुटलों.

आतांपर्यंत मी जत्रेंतल्याच गंमती पहात असे. गावांत नेहमीं गंमती होत असत; पण बाबांच्या धास्तीमुळं मी तिकडे फिरकत नसे. आतां कुणाचाच धरबंध राहिला नव्हता. गांवांतल्या गंमतींना मी राजरोस जाऊं लागलों. एवढेंच नव्हे, तर नाचणारणींच्या पायांतले घुंगर आमच्या वाड्यांत वाजूं लागले.

कामधंद्यांत लक्ष घालायला मला उबग नव्हता. आमचे एक म्हातारे दिवाणजी होते. ते सारा कारभार पहात. मालकाचा कानाडोळा झाल्यावर उत्पन्नाचा बेरीजगोळा घटायला काय अवकाश ! सरकत्यांचं फावलं, कुळांना सोपं सापडलं, स्नेह्यासोबत्यांच्या जळवा तर माझं रक्त चोवीस तास पीत. या गोष्टी मला कळत नव्हत्या असं नाहीं; पण वळत नव्हत्या.

नाचणारणींच्या पायांतल्या घुंगुरांचा नाद आणि त्यांच्या सुरेल गळ्यांतून निघालेल्या लावण्यांच्या लकेरी यांनीं माझे कान भरून गेले होते. नाचतांना त्यांचे होणारे रंगढंग आणि हावभाव यांच्या भुलभुलाव-

णीनं माझे डोळे भरून गेले होते. मला दुसरं कांहीं ऐकूं येत नव्हतं; तिसरं कांहीं दिसत नव्हतं.

आज शेवंता आली, उद्यां गुलाब आली, परवा हौशी आली, तेरवा सुंदरा आली, बिजली आली—असा क्रम रोज चालला होता. गांवोगांवच्या नाचणारणी मुद्दाम वाकडी वाट करून कोपरगांवला येऊं लागल्या. तमासगिरांच्या ताफ्यांत माझ्या नांवाची आवई चांगलीच पसरली !

पाटलांच्या वाड्यावर वर्दी देऊन परत जातांना कुणी भरल्या हातांनीं जाई, तर कुणी भरल्या गळ्यानं जाई. शिवराम पाटलानं कधीं कुणाची आबाळ केली नाहीं. एकीला वाक्या, दुसरीला तोडे, तर तिसरीला कोल्हापुरी साज—अशी बक्षिसांची लयलूट चालली होती. माझा मागचा विचार मागं राहिला होता आणि पुढला विचार पुढं पळत होता.

अशा परिस्थितींत दौलतीचा चुना व्हायला काय उशीर ? अस्तुरीच्या फंदांत जमिनींत पुरलेले व सोन्यानं भरलेले सात रांजण रिते होतील, तर नांगराच्या फाळानं जमिनींतलं धन बाहेर काढणाऱ्या माझ्यासारख्या शेतकऱ्याच्या दौलतीची काय कथा ! बाबांनीं दिडकीला दिडकी लावून साठविलेली दौलत माझ्या हातून मोहरामोहरांनीं निखळत होती. दौलतजादा ! दौलतजादा !

माझ्या डोळ्यांवर धूर चढला होता ही गोष्ट खरी; पण माझा ठाव अजून कोणींच घेतला नव्हता. माझा पतंग जवानीच्या हवेंत घिरट्या घालीत होता; पण त्यानं अजून एकदाहि गोता खाल्ला नव्हता. इतकीं सोन-पाखरं माझ्या वाड्यांवर येऊन गेलीं; पण माझ्या जिवाला चटका असा कुणींच लावला नाहीं. मी कुणाच्याहि ख्यालीं पडलों नाहीं.

नाचणारणी वाड्यावर येत, नरडं पिचेपर्यंत लावण्या म्हणत, कंबरेचा खुर्दा होईस्तवर पहाटपर्यंत नाचत; पण गंमत संपली कीं, बक्षिशी घेऊन वाड्याबाहेर पडत. एखादी नाचणारीण मांडीवर बसायचा हट्ट धरी; पण

मी जवळ बसलेल्या सोबत्याच्या मांडीवर तिची रवानगी करीत असें. चार हात अंतरावरूनचा सारा कारभार !

गेल्या सालची गोष्ट. एकदा मी आगगाडीनं प्रवास करीत होतों. आमच्या डब्यांतले लोक वादविवाद करीत होते. कांहींजण म्हणत होते, 'पैसा श्रेष्ठ' आणि कांहींजण म्हणत होते, 'स्त्री श्रेष्ठ.' निरनिराळीं उदाहरणं देऊन प्रत्येक बाजूचे लोक आपला मुद्दा पुढं सरकवीत होते. मीं कांहीं मधें तोंड घातलं नाहीं. त्यांच्यापैकीं कुणीं जर मला विचारलं असतं तर– तर मी काय सांगितलं असतं, माहीत आहे ? मीं सांगितलं असतं कीं, 'पैसाहि श्रेष्ठ नाहीं आणि स्त्री तर नाहींच नाहीं. जगांत मिळणारा भलाबुरा अनुभव हा या दोघांपेक्षाहि जास्त किंमतीचा आहे.' पण जाऊंद्या ! हें विषयांतर झालं.

असं होतां होतां दोन वर्षे लोटलीं. माझ्याजवळचा पैसाअडका पार बुडाला लागला. पण जवळची मंडळी मला पैशांची चणचण भासूं देत नसत. कोणी मला हातउसने देई, तर कोणी लेखी उसने देई. अशा रीतीनं देण्यांची व देणेकऱ्यांची संख्या फुगत चालली होती.

याच सुमारास कोपरगांव तालुक्यांत गुळाच्या धंद्याला बरकत आली. खतांनीं भरलेल्या वाघिणी कोपरगांव स्टेशनावर येऊन थडकूं लागल्या. पाटाच्या पाण्यावर ऊस पिकविण्याचा धूमधडाका जिकडे तिकडे सुरू झाला. ठायीं ठायीं गुऱ्हाळ लागूं लागलं. मी या धंद्यांत लक्ष घालावं आणि कलत्या दौलतीला टेका द्यावा असा कांहीं भल्या माणसांनीं मला आग्रह केला. हणमंतराव पाटलांच्या दौलतीला बसलेला हादरा त्यांना बघवत नव्हता. पण मीं त्यांच्या साखरशब्दांना कान झाकले; त्यांच्या सांगण्याचा इन्कार केला. माझी डोळेफीर झाली होती.

जमिनींना मागणी येऊं लागली. एकरवार भाव तडकूं लागले. शेटि-यांनीं लांब मुदतीच्या बोलीनं जमिनी घेण्याचा धडाका लावला. ही संधि बरी आहे असं वाटून मीं कांहीं जमिनी फुंकून टाकल्या आणि कांहीं

जमिनींचे वीस वर्षांच्या मुदतीचे करार करून दिले. हातांत आलेल्या निम्म्याअधिक रकमेनं मी देणेकरी भागविले. बाकीचे पैसे माझ्या हातांतून ओघळण्याची वाट पाहूं लागले.

पौष सरून फाल्गुन लागला. शिमग्याचा सण जवळ येऊन ठेपला. शिमगा म्हणजे तमासगिरांची सुगी. या शिमग्याला एक नवीन पांखरू कोपरगांवीं येणार आहे अशी आम्हांला कुणकुण लागली. येवल्याची बकुळा अजून आमच्या गांवीं आली नव्हती.

'होळीला लाकडं' असा पुकार रस्तोरस्तीं होऊं लागला. पोरंसोरं शेण्यांसाठीं रान धुंडूं लागलीं. डफ व मनगटं वाजूं लागलीं. शिमगा सुरू झाला. येवल्याचा ताफा आला. रंगीत कनाती लावलेल्या बैलांच्या घमर्णीत बसून बकुळा आमच्या गांवांत येऊन उतरली.

शिमग्याचा दिवस. दिवाळीचा सण गाजत नाहीं असा शिमग्याचा सण त्या वेळीं खेड्याखेड्यांतून गाजत असे. सकाळपासून लोकांनीं आपलीं तोंडं मोकळीं सोडलीं होतीं. संध्याकाळच्या वेळीं घरोघर आणि नाक्यानाक्यावर होळ्या भडकल्या. होळीची पूजा व पुरणपोळीचं जेवण झाल्यावर गांवांतले लोक बाहेरच्या मैदानाकडे वळले.

रात्रीं दहा वाजण्याचा सुमार. चांदीच्या ताटलीएवढा चंद्र बकुळीची गंमत पहाण्यासाठीं वर सरकत होता. मैदानाच्या मध्यभागीं उंच असा ओटा बांधलेला होता. वासे उभे करून त्यांना चौफेर पडदे सोडलेले होते. मधून मधून गॅसच्या बत्त्या टांगलेल्या होत्या. ओट्यासभोंवार चारहि बाजूंना ही गर्दी झाली होती ! एवढी मोठी जागा, पण माणसं कशी ठेचून भरलीं होतीं. ओट्याच्यापुढं शेलक्या माणसांसाठीं जाजमं अंथरलेलीं होतीं. मी माझ्या सोबत्यांबरोबर जाजमावर बसलों होतों.

पडदा वर सरकला. गंमत उभी राहिली. तुणतुणं तुई तुई करूं लागलं. डफावर थाप पडली. लोखंडाच्या कडीवर गजानं ठेका धरला. लोकांचा गलका कमी होऊं लागला. बकुळीचा फड पुढं आला. त्यानं पाठी वाक-

वून लोकांना मुजरे केले. आमच्याकडे पाठी वळवून त्यांनीं गणपतीचं नमन सुरू केलं–

आधि नमन गणा, गणपती सारजेचा पति ।
देइ मूषकवाहना, रंग भराया मति ॥

डफ कडकड वाजूं लागला. लोखंडाच्या कडीवरचा ठेका जलद पडूं लागला. तुणतुणेवाल्याचीं बोटं गोमेच्या पायांसारखीं वळवळ करूं लागलीं. झीलकरी झील ओढूं लागला–जी ऽ जी ऽऽ जी !' लोकांचा गलबला पार शांत झाला.

नमन संपलं. तमासगिरांनीं तोंडं वळवलीं. आपले रंगीबेरंगी पटके सावरीत ते तयारीनं उभे राहिले. सोंगाड्या पुढं आला. त्यानं बकुळीच्या जोडीदारणीला हटकलं, “ काय ग ? कुठं चाललां तुम्हीं ? ”

“ मथुरेच्या बाजाराला.” जोडीदारणीनं उत्तर केलं.

“ मथुरेच्या बाजाराला काय वांगीं घ्यायला जातां ? ”

“ नाहीं रे भाऊ, आम्ही दहीदूध विकायला निघालों. ”

“ भाऊ कुणाला म्हणती ? शरम नाहीं वाटत ? मी गोकुळांतला कृष्ण आहे कृष्ण ! बरं, ती राधा कुठं आहे ?”

“ राधा होय ! ती पहा पाठीमागून येत आहे. ”

पडद्यामागं घुंगुर वाजूं लागले. आंतूनच लावणीची लकेर आली.

सोड माझी वाट कान्हा,
अडवूं नको रे मला !

डोक्यावरचा घडा सावरीत राधा पुढं आली. येवल्याच्या बाजारपेठेंतल्या उंची रेशमी वस्त्राची झुळझुळीत घडीच जणूं काय कोपरगांवांत उलगडली ! बकुळीला पाहून लोक चित्रासारखे स्तब्ध झाले. तिचा तो अटकर बांधा, गोराभुरका रंग आणि लावणीशीं एकजीव होऊन तिनं केलेले हावभाव यांनीं माझ्या काळजाचा लचका तोडला. तिच्या उंच

आवाजांतल्या ताना ऐकून माझ्या अंगाचं पाणी झालं. मी तिच्याकडे पापणी न ढळवितां पाहूं लागलों.

तमाशा रंगत चालला. लावणीमागून लावणी झडूं लागली. नाचून-नाचून बकुळीच्या कपाळावर घामाचे थेंब चमकूं लागले. पण पोरगी बहाद्दर तर खरीच ! दर लावणीला ती चढा आवाज लावून गायची. दर गिरकीला ती दणक्यानं नाचायची. लोक दौलतजादा करूं लागले. बकुळीच्या अंगावर पैशांचा सडा पडूं लागला. तिच्या पायांशीं चवल्या-पावल्यांचा खच झाला. फडांतला एक माणूस नाणीं वेचून रुमालांत गोळा करूं लागला. वेचतां वेचतां त्याची पुरेवाट झाली. त्याच्या हातांतलं गाठुडं फुगत चाललं.

कुणीं रुपया दाखविलाच, तर ती दौलतजादा बकुळा पुढं येऊन आपल्या हातानं घ्यायची. अधेल्यांकडे तिनं ढुंकून पाहिलं नाहीं. कित्येक हरीचे लाल पुढं सरकत आणि तिच्या हातांत रुपया देत. बोटाला बोट लागतांच नव्या नवरीप्रमाणं नखरा करून ते मागं सरकत.

मी बराच वेळ गप्प बसलों होतों. नंतर मलाहि खुमखुमी आली. मी खिशांत हात घातला व मूठभर रुपये काढले. मूठ वर धरल्याबरोबर बकुळा माझ्याजवळ आली व माझ्याकडे पाहून गोडपणें हसली. माझ्या मुठींतले रुपये ती घेऊं लागली. मीं मूठ घट्ट दाबून धरली. आपल्या दोन्ही हातांनीं तिनं माझी मूठ सोडविली व रुपये घेतले. माझ्या हातांना गोड झिणझिण्या आल्या. मी तिला, “ कोकणिं ग वस्ती ” ही लावणीं म्हणायला सांगितलं.

बकुळीनं ती लावणी म्हणायला सुरवात केली. इतक्यांत प्रेमचंद नांवाच्या एका मारवाड्याच्या पोरानं तिला रुपयांची मूठ दाखविली. लावणी थांबवून ती त्याच्याजवळ गेली. तिनं ते रुपये घेतले. प्रेमचंदानं तिला, “ कोकणिं ग वस्ती ” ही लावणी बंद करून “ मोटारवाला ” ही लावणी म्हणायला सांगितलं. त्यानं नुकतीच एक मोटार विकत घेतली

होती आणि कोपरगांव ते नगर अशी सर्व्हिस सुरू केली होती. बकुळीनं माझ्याकडे डोळे मिचकावून पाहिलं व मोटारवाल्याच्या लावणीला सुरवात केली.

मी ताडदिशी उठलों; दोन्ही खिशांत दोन हात घालून दोन मुठी रुपये बाहेर काढले; आणि बकुळीला जवळ बोलावलं. ती जवळ आली. मीं तिच्या ओंजळींत दोन्ही मुठींतले रुपये टाकले आणि तिला मोटारवाल्याची लावणी बंद करून "कोकणिं ग वस्ती" हीच लावणी पुन्हां सुरू करायला सांगितली. लावणी सुरू झाली—

कोकणिं ग वऽस्ति
लइ अजब दिसती !

मोटारवाल्याची मोटार अडून राहिली. कोकणच्या अजब वस्तींनं जोर धरला. प्रेमचंदानं माझ्याशीं अटतट लावण्याची हिंमत धरली नाहीं. तो गप्प बसून राहिला. बकुळींनं प्रेमचंदाला खिजवण्याचा पुष्कळ यत्न केला. पण कांहीं उपयोग झाला नाहीं. लावणी संपल्यावर मीं पुन्हा मूठभर रुपये पुढं केले. माझ्या मुठीला आपल्या नरम हातांनीं कुरवाळीत बकुळीनं ते रुपये काढून घेतले. घरून निघतांना दोन्ही खिसे मीं रुपयांनीं भरून घेतले होते. त्या रुपयांची मी खैरात करीत होतों. बकुळीवर मी न्यहाल झालों होतों.

बकुळाहि खुशींत आली होती. ती एकामागून एक ठेवणींतल्या लावण्या काढीत होती. प्रभाकर, होनाजी बाळ, राम जोशी, सगनभाऊ, परशराम, बहिरू, पट्टे बापूराव या सर्व कवींच्या लावण्या तिच्या जिभेच्या शेंड्यावर नाचत होत्या. एकेका लावणीला ती जणूं काय उजळा देत होती. एक वाजेपर्यंत लावण्यांच्या फैरी झडत होत्या. नंतर वगाला सुरवात झाली.

माझ्या कोटाच्या आंतल्या खिशांत शंभर रुपयांची एक नोट होती. ती राहून राहून माझ्या अंगाला बोचत होती. मी ती बाहेर काढली. मांज-

राचं उंदरावर नसेल इतकं बकुळीचं माझ्यावर लक्ष होतं. मीं ती नोट बाहेर काढल्याबरोबर ती लगबगीनं माझ्याजवळ आली. मीं ती नोट माझ्या उजव्या हाताच्या बाहीच्या मध्यावर ठेवली आणि तिला ती दातांनीं उचलण्यास सांगितलं. लोक माझ्याकडे टकमका पहात होते. मला कुणाचीच दखल नव्हती. माझ्या अंगांतल्या रक्ताला आधण आलं होतं. बकुळीनं ती गोष्ट करण्याचं नाकारलं. मी ती नोट परत खिशांत ठेवून दिली. त्या हिरव्यागार सुंदर नोटेवरला शंभराचा आंकडा बकुळीला परत जाऊं देईना. अखेरीस ती कबूल झाली. मीं बाहीवर ठेवलेली नोट तिनं पाठ वाकवून आपल्या दातांत धरून उचलली. नोट तिची झाली. मला धन्य वाटलं. तावडींत नाग सापडलेल्या मुंगुसाप्रमाणं ती परत गेली. नागाच्या फणीवर तरी फक्त दहाचाच आकडा असतो !

वग संपत आला. पहाट होऊं लागली. माझ्या खिशाप्रमाणंच चंद्र खालीं चालला होता.

तमाशा संपला. बकुळीची वाखाणणी करीत आणि तिच्या त्या दिवसाच्या कमाईचा आढावा घेत लोक घरोघर निघाले. मीहि जड पावलांनीं आणि हलक्या खिशांनीं वाड्यावर गेलों. पूर्वेला शेंदूर लागायला अजून चारपांच घटकांचा अवकाश होता. मी अंथरुणावर पडलों; पण माझ्या डोळ्याला डोळा लागला नाहीं.

बकुळीचा मुक्काम कोपरगांवीं आठ दिवस होता. रोज तिची गंमत होई. मी एकहि दिवस खाडा केला नाहीं. माझ्या दौलतीला पडलेला खड्डा रोज मोठा होत गेला.

बकुळीचा मुक्काम हलण्यापूर्वी मीं तिला एकवार वाड्यावर बोलावलं. तिनं येण्याचं कबूल केलं. त्या रात्रीं मीं माझ्या वाड्यांत रोषणाईची झकपक केली; अंगणांत तांदळाच्या पिठाच्या रांगोळ्या काढल्या; आढ्याला टांगलेलीं झुंबरं चंदनाच्या तेलानं पेटविलीं. गंमतीसाठीं गांवांतली शेलकी मंडळी बोलावलेली होती. बकुळा आली. त्या रात्रीं ती मन

लावून गायली; शीण घेऊन नाचली. तिच्या पायांखालच्या सतरंजीला जागोजाग भोकं पडलीं.

पहाटेच्या प्रहरीं बकुळा जायला निघाली. तिच्या अंगावर मीं भरजरी बनारशी शालू घातला. कोवळ्या भेंडीसारख्या तिच्या बोटांत मीं माणकाची अंगठी चढवली. बेहाय खूष होऊन बकुळा परत गेली. दुसऱ्या दिवशीं तिनं कोपरगांवचा मुक्काम हलवला. ती नगरला गेली. नगरला तिचा एक महिन्याचा ठिय्या ठरला होता.

त्यानंतर गांवांत आणखी नाचणारणी आल्या. नेहमींच्या जागेंत तमाशाचे कार्यक्रम रोज होत होते. पण मी एकहि दिवस तमाशाला गेलों नाहीं; एकाहि पांखराला वाड्यावर बोलावलं नाहीं. लोक नवल करूं लागले. तो सबंध पंधरवडा मला अगदीं बेचैन गेला. सुरतपाक बकुळीनं माझ्या जिवाला हटकण लावली होती. तिकडे बकुळी नगरकरांचीं मनं रिझवीत होती. इकडे माझा जीव तिच्यासाठीं झुराबावरा झाला होता.

त्यांत पुन्हां दिवाणजींची कुरकूर! तांबड्या शिवराईला मी महाग झालों होतों. बकुळीच्या आठ दिवसांच्या मुक्कामांत मीं माझ्या संत्र्यांच्या बागा गहाण लावून दिल्या होत्या. नाहीं म्हणायला मोसंबीच्या दोन बागा तेवढ्या साकसुरत राहिल्या होत्या. दौलतजादा करून मीं दौलतीचा भंडवाडा केला होता. पण माझ्या डोळ्यांवरली नशा अजून उतरली नव्हती. दिवाणजींनीं पुराण सुरू केलं रे केलं कीं, मी त्यांना धुडकावून लावीत असें.

आणखी एक आठवडा गेला. आतां मात्र जिवाला गमेना. माझं सारं लयलक्ष बकुळीकडे लागलं होतं. तिच्या भेटीसाठीं मीं नगरला जायचं ठरविलं. मोसंबीच्या बागा मीं एका मारवाड्याला गहाण लिहून दिल्या; त्याच्याकडून पांचशें रुपये घेतले; आणि नगरचं तिकीट काढलं. प्रेमचंदची कोपरगांव ते नगर ही मोटार सर्व्हिस चालू होतीच. एक रुपया टाकला

कीं, मोटार स्वारी न्यायला घरीं यायची आणि नगरला ठिकाणावर पोचवायची.

मोटार घरीं आली. ड्रायव्हरनं मला पुढली जागा दिली. मोटार नगरचा रस्ता कापूं लागली. रस्त्यानं ड्रायव्हरनं माझ्याशीं बातचीत सुरू केली. तो जातीनं वंजारी होता. त्याचं नांव मारुती असं होतं. त्याचा तो कळकट अवतार पाहून लोक त्याला 'मारत्या' म्हणत. बोलाचालायला बरा होता; पण भारी घाणेरडा! त्याच्या डोक्याला फणी आणि कपड्याला पाणी माहीत नव्हतं.

तीनचार तासांत मोटार नगरमधें आली. मीं गुजरात लॉजमधें उतरायचं ठरवलं होतं. त्याप्रमाणं मारत्यानं लॉजसमोर गाडी उभी केली. त्यानं माझं सामान खालीं उतरून ठेवलं. मोटारमधून खालीं उतरल्यावर बक्षीस म्हणून मीं त्याच्या अंगावर एक रुपया फेकला.

नगरमधें इब्राहिम थिएटर नांवाचं एक तमाशाचं थिएटर होतं. त्या थिएटरमधें रोज तीनचार नाचणारणींच्या पाळ्या असत.

मी थिएटरपाशीं गेलों. तिकीट काढायच्या जागेजवळ त्या रात्रीं ज्या ज्या नाचणारणींच्या पाळ्या होत्या, त्या एका बाकावर बसून राहिल्या होत्या. त्यांच्यांत मला बकुळा दिसली नाहीं. चौकशी करतां ती मागाहून येणार आहे असं समजलं. सव्वा रुपयाचं तिकीट काढून मीं आंत गेलों. स्टेजवर विंगच्यामागं कांहीं खुर्च्या ठेवलेल्या होत्या. मी एका खुर्चीवर जाऊन बसलों.

महारांच्या ढोलकीच्या तमाशानं सुरवात झाली. नाचायला नाच्येपोरेच होते. कानठळ्या बसतील इतक्या मोठ्यानं ते महार डफ आणि नरडीं वाजवीत होते. बारा वाजेपर्यंत तीन नाचणारणींच्या पाळ्या झाल्या. मला कुणांतच राम वाटला नाहीं.

नंतर बकुळा आली. तिच्या अंगावर मीं दिलेला शालू चमचम करीत

होता. आपल्या डोक्यावर तिनं लठ्ठ अशी फुलांची वेणी घातली होती. वेणींतला जर बत्तीच्या प्रकाशांत चमकत होता. लोकांना मुजरा केल्यावर तिचं माझ्याकडे लक्ष गेलं. तिनं तिथूनच मला स्वतंत्र मुजरा केला आणि लगबगीनं ती माझ्याकडे आली. सुमारें तीन मिनिटं ती माझ्याशीं बोलत होती. लोकांनीं फारच गिल्ला केल्यावर ती त्यांच्या ‍र गेली. तिनं गायला व नाचायला सुरवात केली. बकुळीला पाहू णि तिच्याशीं चार शब्द बोलून माझा जीव सुपाएवढा झाला.

नमनाची लावणी संपल्याबरोबर मीं तिला बोटानं खुणावलं. ती माझ्याजवळ आली. मीं मुकाट्यानं तिच्या हातांत दहाची एक नोट ठेवली. बकुळीनं ती नोट लोकांना दाखवली व ती म्हणाली, "ऐका, या नोटेचं काय म्हणणं आहे ?"

"काय ?" सोंगाड्यानं हेल काढून विचारलं.

"'कोकणि ग वस्ती' ही लावणी ठासून झाली पाहिजे." माझ्याइ हसून पहात बकुळा म्हणाली. माझ्या अंगावर मोटभर मांस चढं सोंगाड्यानं मान हलवली. लोकांनीं टाळ्या वाजवल्या. ती लाव म्हणत बकुळा दणक्यांत नाचूं लागली.

त्या रात्रीं बकुळीसाठीं मी शंभर रुपयांची खिरापत केली. बरोबर दीड वाजतां तमाशा संपला. घरीं जाण्यापूर्वी बकुळा माझ्याजवळ आली पायाच्या अंगठ्यापासून डोक्यावरच्या केसांपर्यंत माझं अंग कढत झा होतं. मीं बकुळीला म्हटलं, "बकुळा, मला उद्यां तुझ्या घरीं यायचय्

"या ना. घर तुमचं आहे. बकुळा तुमची आहे."

"बरोबर काय आणूं ?... आपलं... किती आणूं ?" मीं चाचरत विचारलं.

"काय तुमच्या खुषीला वाटेल तें घेऊन या."

"केव्हा येऊं ? तुझं घर कुठं आहे ?"

माझी उतावळी पाहून तिला खुदकन् हसूं आलं. तिनं मला तिच

ठिकाणाचा पत्ता सांगितला. नंतर ती आर्जवानं म्हणाली, "रात्रीचं जागरण होतं. जेवण करून मी झोपतें. दुपारीं चारच्या पुढं केव्हांहि या."

दुसऱ्या दिवशीं सकाळीं मी उशीरानं उठलों. इतक्यांत लॉजचा मनुष्य आला. एका दिवसाची राहाणावळ व जेवणावळ अगाऊ [illegible] ाचा शिरस्ता होता. कालच्या व आजच्या अशा बिलांचे पैसे मी [illegible] गावर टाकले. चहा घेतल्यावर भटकण्यासाठीं म्हणून मी बाहेर पड[illegible].

दुपारचं जेवण झाल्यानंतर मी पलंगावर आडवा झालों. पण गोड गोड विचारांनीं डोक्यांत गर्दी केली. झोप म्हणून येईना. अखेरीला तीन वाजतांच कपडे करून बाहेर पडलों. शिल्लक राहिलेल्या चारशें रुपयांच्या नोटा खिशांत होत्या. सुमारें पंधरा मिनिटांत बकुळीनं सांगितलेला पत्ता सापडला. मीं जिना चढूं लागलों.

तसं पाहिलं तर हा माझा पहिलाच प्रसंग! या पल्ल्याला मी अजून केव्हांच गेलों नव्हतों. त्यामुळं जिना चढतांना माझे पाय लटपटत होते; जीव गुदमरला होता.

जिना चढून वर गेल्यावर मी दारापुढं उभा राहिलों. दार लोटलेलंच होतं. आंत जाऊं कीं नको, असा विचार क्षणभर मनांत डोकावला. माझी छाती खालीं वर हेलकावे खात होती. इतक्यांत आंतून कोणी तरी बोलल्याचा व हसल्याचा आवाज कानीं आला. मीं फटींतून पहाण्याचा प्रयत्न केला; पण कुणीच दिसलं नाहीं. मी तसाच उभा राहिलों.

आंतलं एक दार उघडल्याचा आणि पुन्हां बोलल्याचा आवाज आला. बकुळीचा आवाज मीं ओळखला. ती कुणाशीं तरी बोलत होती. दुसऱ्या व्यक्तीचाहि आवाज ओळखीचा वाटला. माझ्या समोरच्या दारामागं बकुळा बोलूं लागली.

"हं, आतां जा तुम्ही. आज शिवराम पाटील येणार आहेत."

" कोण ? शिवराम पाटील ? अरे वा ! " ती व्यक्ति मोठयानं हसूं लागली.

" चला, पैसे काढा आणि बाहेर व्हा." बकुळा तुटकपणें म्हणाली.

" पैसे होय ? घ्या बुवा ! शिवराम पाटलांनीं काल बक्षीस दिलेलाच रुपया तुम्हाला देतों. हा घ्या."

त्यानंतर रुपया वाजवून घेतल्याचा आवाज झाला आणि दार उघडलें. माझ्यासमोर काळाकभिन्न, केस पिंजारलेला, बोटभर दाढी वाढलेला व मोटारीच्या वंगणानं ठिकठिकाणीं माखलेला मारत्या उभा होता ! मारत्याच्या मागं माझ्या दौलतीवरून वरवंटा फिरविणारी माझी बदामची राणी उभी होती. तिचे केस विसकटलेले होते. तिचा पदर अस्ताव्यस्त होता.

तें पाहून माझ्या डोक्यांत दगड शिजूं लागले. माझ्या कपाळावरल्या शिरा ताडताड उडूं लागल्या. मी संतापानं थरथर कापूं लागलों. खाऊं का गिळूं अशा नजरेनं मीं मारत्याकडे पाहिलं. तो भांबावल्यासारखा दिसत होता. मी पुढं होऊन मारत्याच्या मानेला हात घातला आणि त्याला खस्सदिशी ओढून एक जोराची गचांडी दिली. जिन्यावरून कोलमडत मारत्या खालीं गेला.

नंतर मीं जळत्या नजरेनं बकुळीकडे पाहिलं. तिच्या चेहऱ्यावर कांहींच फरक दिसला नाहीं. ती मंजूळपणें म्हणाली,

" पाटील, या ना आंत."

मी आंत गेलों. संतापानं माझ्या तोंडांतून शब्द बाहेर पडेना. जराशानं मी म्हणालों,

" तो वंजारी इथं कशाला आला होता ? "

" कशाला म्हणजे ? तें माझं गिऱ्हाईक आहे. " ती शांतपणें उत्तरली.

" आणि त्यानं तुला एक रुपया दिला ? " मी त्वेषानं म्हणालों.

" होय. ही ज्याच्या त्याच्या खुषीची गोष्ट आहे. सगळे थोडेच तुमच्यासारखे रावराजे असतात ! ज्याला जें परवडतं तें तो देतो."

मीं संतापानं खालचा ओठ सुजेपर्यंत चावला आणि ओरडलों, " चांडाळणी ! मीं माझी सारी दौलत तुझ्यावरून ओवाळून टाकली..."

" मी नाहीं कुठं म्हणतें ? मीं कालच तुम्हांला सांगितलं, कीं बकुळा तुमची आहे. बरं, पण असं रागावतां काय ? चला ना आंत. माझ्यासाठीं खिशांत काय आणलय् तें तर पाहूं. "

बकुळा लाडालाडानं माझ्याजवळ आली. माझा तोल सुटला. मीं जोरानं तिच्या एक मुस्कार्डीत मारली. ती धाड्दिशी खालीं पडली. तिचा डावा गाल हिरवानिळा झाला. गालावरून हात फिरवीत ती इवळली,

" अग, आई ग ! माझा गाल···"

" हे धर, चारशें रुपयांचं मलम लाव त्याला. "

खिशांतलं नोटांचं पुडकं काढून मीं तें तिच्या तोंडावर फेकून मारलं. साऱ्या खोलीभर नोटाच नोटा झाल्या !

बकुळा लगबगीनं उठली आणि नोटा गोळा करूं लागली. मीं पाठ फिरवली आणि धाड्धाड् करीत जिना उतरून खालीं आलों.

लॉजमधें जाऊन मीं सामान आवरलं व बाहेर पडलों. बिल सकाळीं दिलेलंच होतं. झपाझप पावलं टाकीत मीं मोटार स्टॅंडवर गेलों. मारत्याची मोटार निघायच्याच तयारींत होती. पुढली जागा रिकामीच होती. मी तिथं जाऊन बसलों.

मारत्यानं माझ्याकडे पाहिलं. तो कांहीं बोलला नाहीं. एजंटनं मला एक तिकीट फाडून दिलं व रुपयासाठीं हात पुढं केला. मीं खिशांत हात घातला; पण–पण खिशांत कांहींच नव्हतं. मीं सर्व खिसे चाचपले; पण कांहींच सापडेना !

मारत्यानं आपल्या मळकट पाटलोणीच्या खिशांत हात घातला आणि एक रुपया काढून तो एजंटाच्या हातावर ठेवला. मोटार कोपरगांवची वाट चालूं लागली.

---

### ग. ल. ठोकळ यांच्या स्फुट कवितांचा संग्रह

# मीठभाकरी

**वा. म. जोशी**—मी अलिकडे कांहीं वाचीत नाहीं; तथापि आपलें पुस्तक चाळून पहाण्याच्या इच्छेनें हातीं घेतलें. त्यांतील ‘ सुनीता ’ मला फार आवडल्या. आपल्या पुस्तकानें दोन–तीन तास फार चांगले गेले.

**केसरी**—वृत्त, विषय, विचार व भाषा या सर्व दृष्टींनीं आधुनिक मराठी कवितेचा सुंदर नमुना म्हणून हा कवितासंग्रह आहे. सुनीता या सदरांतील पस्तीस छोट्या कविता म्हणजे स्वभावोक्ति, विनोद व कल्पकता यांचा सुगंधी गुच्छच आहे. जात्यावरलं, मोटेवरलं अशीं गाणीं वाचणें म्हणजे सप्ताहांत सफर काढणेंच होय !

---

### जानपदगीतांचा पहिलाच प्रातिनिधिक संग्रह

# सुगी

**केसरी**—विशिष्ट निसर्गसंबंधी कवितांचा संग्रह या दृष्टीनें ‘सुगी’चें स्थान मराठी काव्यांत वरचें आहे.

**ज्ञानप्रकाश**—जानपदगीतांचा हा जो अल्प प्रसार आजपर्यंत झाला, त्याचें बरेंचसें श्रेय श्रीयुत ग. ल. ठोकळ यांनाच आहे.

**महाराष्ट्र**—आधुनिक कवितेचा एक रमणीय विशेष लोकांच्या निदर्शनाला आणणारा अशा तऱ्हेचा उत्कृष्ट काव्यसंग्रह प्रकाशित केल्याबद्दल, श्री. ठोकळ यांचें आम्ही अभिनंदन करितों.

---